


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका



# दीपावली

गणराज्य दिन विशेषांक

फेब्रुवारी १९७० * वर्ष २५ वे * मूल्य २ रु.

## श्रेयनामावली

**सत्ता**. .कोणाच्या हाती आहे त्यावरच सर्व अवलंबून आहे. .**दादूमिया** ● **माझ्या माहितीचे माडखोलकर**. . .जुन्या पिढीतील साहित्यिक-पत्रकार. **अरविंद ताटके** ● **आज अचानक गांठ पडे**. .त्या फोटोकडे पाहायचं नि तळमळायचं **प्रभाकर पेंढारकर** ● **गृहस्थ गाथा**. सुखी जीवनाचा महामंत्र. .**ग. का. भडकमकर** ● **नेफा–पराभव की पिछेहट**. .हा पराभव नव्हेच .**लेफ्ट. जनरल (निवृत्त) शंकरराव थोरात** ● **अहेर**. पहा पहा माझ्या नीलाक्षीचे डोळे. .**सौ. वीरा शर्मा** ● **प्रस्थापितांविरुद्ध बंड**. .परिसंवाद. .**डॉ. श्री. शां. आजगांवकर** ● **बावळऽ ट**. लॉटरीचे बोगस तिकीट .**ना. शं. पत्की** ● **जिणे न माझे लाजिरवाणे**. .चित्रतारकेची खळबळजनक आत्मकथा **प्रभाकर अत्रे** ● या वर्षाचे नोबेल पारितोषिक विजेते. **सॅम्युअल बेकेट–दि. श्री. कराडकर** ● **कशाला भरविता असली प्रदर्शने**. चित्रकार **व्ही. एस. गुर्जर** यांनी टाकलेला प्रकाशझोत याशिवाय कविता. .दीपमाला. आमचेही (एक) मत ऐसी अक्षरे रसिके. सन्मानपुर्वे इत्यादि नेहमीची सदरे.

❋ समाजवादाचा जोरदार पाठलाग ❋

**मासिक व्यंगचित्रमाला**


टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay–4.




अनुक्रमणिका



## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, कॅनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
● **स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ** झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# उपचार नको ! उत्कटता हवी

भारताच्या प्रजासत्ताकाचा एकविसावा वाढदिवस साजरा होत आहे. होईल. नेहमीमाणेच सारे शाही पद्धतीने साजरे होईल. ध्वजवंदन, लाल किल्ल्यावरून पंतप्रधानांचे भाषण, राष्ट्रपतींचा संदेश, सैनिक, वैमानिक आणि नौदल सैनिकांची संचलने होतील. पोलिसांचीही संचलने होतील. मुख्यमंत्री मानवंदना स्वीकारतील. तें ऐश्वर्याचा, त्यागाचा संदेश देतील. पुन्हा एकदा समाजवाद, दारिद्र्य विनाश, राष्ट्रीयीकरण आदि गोष्टी बोलल्या जातील व त्यासाठी जनतेने त्यागाला, कष्टांना सिद्ध रहावे व प्रतिज्ञाबद्ध व्हावे म्हणून आवाहने केली जातील. घराघरावर ध्वज उभे राहतील आणि काही घरातून समारंभही होतील गोडधडही खपेल. हे असेच होत आले आहे होत आहे आणि होत राहीलही. उच्चार आणि कृति, निष्ठा आणि समर्पण सेवा आणि सेवेसाठी सर्वस्वाचे बलिदान ह्यातला अभेद इथे एके काळी प्रत्ययाला येत होता. भाषा कर्मयोगाची आणि कृति क्लीबाची असे इथे दिसत नसे. 'जे का रंजले गांजले' त्यांना 'आपुले' म्हणणाऱ्या देवांची व साधूंची इथे वाण नव्हती. इथे सत्यासाठी राज्यत्याग, शब्दासाठी वनवास आणि मातृभूसाठी विजनवास व हसत हसत फास वरणारांची एक अखंड परंपरा ताठ मानेने, ताठ कण्याने उभी होती म्हणून शक, हूण, शिकंदर आले आणि टकरा खाऊन परत गेले. इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज साम्राज्यशाह्या सिंधुसागरात बुडून गेल्या. कारण ह्या मातीने इमान सोडले नव्हते. मातीने धर्म सोडला नव्हता. मातीने रामायण-भारत-गीता, वेद-उपनिषदांचे स्तन्य पचवले होते आणि म्हणूनच 'नैनं वहति शस्त्राणि । नैनं दहति पावकः" ह्या वृत्तीने ती उभी राहिली अजेय, अभेद्य, अखंड !! देशाचे स्वातंत्र्य, देशाचे पुनर्वैभव, देशाची शान आणि देशाचा मान आपल्या शान-मानांपेक्षा मोलाची मानणारी एक थोर परंपरा इथे जन्मली, रुजली, वाढली म्हणूनच देश-देव-धर्मासाठी इथे लाख बांगडी पिचली तरी पुरुषार्थ मेला नाही. जय-पराजय, यशापयश येत जात असते. अखेर ह्या लाटांवर जे स्वार होऊ शकतात त्यांनाच इतिहास घडविता येतो. आणि त्यांचीच नावे इतिहास 'जमा' होत नाहीत. ह्या परंपरेचे आम्ही पाईक आहोत. इथे 'रामकृष्णही आले गेले । त्याविण जग का ओसचि पडले । कुणी सदोदित सूतक धरिले । मग काय अटकले मजशिवाय ?" असे तत्वज्ञान जन्मते व देवाबरोबर नववधूचे नाते सांगितले जाते. स्वातंत्र्यानंतरच्या गेल्या वीस बावीस वर्षात आपण जे केले, जे पाहिले, जे पाहण्याची इच्छा नसली तरी दिसले आणि ज्यांचे काही बरेवाईट परिणाम आज व्यक्ति आणि समाजजीवनावर, राष्ट्रीय परंपरेवर, सामान्य श्रद्धा, निष्ठांवर होत आहेत ते पाहतो आहोत—त्याबाबत काही विचार, काही आत्मपरीक्षण, काही नवे संकल्प मनात बांधणे व कार्यान्वित करणे ह्या गोष्टी व्हायला हव्यात की नुसते समारंभ, सोहळे व ऐक्याची 'बोली' भाषाच फक्त आपण करीत राहणार आहोत? आज मोठा तो खोटा आणि 'नैतिकता' ही फक्त सभा संमेलनातील 'फुलदाणी'सारखी शोभेची वस्तु असेच चित्र दिसते आहे. हा दोष कुणा एका व्यक्तीचा, पक्षाचा, संघटनेचा वा दलाचा नसेलही. आम्ही सारेच त्याला अंशतः जबाबदार आहोत. प्रजासत्ताकात प्रजा सावध, क्रियाशील, प्रगत विचारांची आणि न्याय-सत्यप्रिय असावी लागते. तिला हक्काप्रमाणे कर्तव्येही करावी लागतात. प्रजासत्ताकाचा वाढदिवस साजरा करताना व्यक्ति-समाज-राष्ट्र दृष्टचा आम्ही असे कमी-कमी कां होत जातो आहोत याचा मूलगामी विचार होणे अगत्याचे आहे. अन्यथा उपचार होतील. त्यात शब्द असतील, अर्थ असणार नाही. भावही असणार नाही. आज आम्ही 'अर्थकारण'ही साधले नाही. राजकारणातही पराभूत आहोत. आणि 'भाव'कारणातली अवघी उत्कटता आम्ही हास्यास्पद करून टाकली आहे.

आपण आपल्याला कधी ओळखणार आहोत ?

–संपादक

## लक्ष्य : प्रगति

# अथवा, एका तेलशुद्धीकरण कारखान्या मार्फत दोन कारखान्यांचं काम करून घेण्याची खुबी.




नवे तेलशुद्धीकरण कारखाने उभारण्याच्या गोष्टी बोलायला ठीक. पण त्यांत ३० ते ४० कोटी रुपयांचा भुर्दंड आहे. पेट्रोलियमजन्य पदार्थांची मागणी आजच्या १४० लक्ष टनांवरून १९७५ च्या सुमारास ३०० लक्ष टनांवर जाईल. ती पुरी करण्यासाठी देशाला केवढा खर्च येईल याची कल्पना आहे? १६० लक्ष टनांच्या शर्थीचा तुटवडा भरून काढण्याची ही समस्या म्हणजे मानवी कर्तृत्वाला आव्हान आहे.

तेल "शुद्धीकरणाची"च समस्या घ्या ना. नवे कारखाने उभारल्याशिवाय भारताला आपली तेलशुद्धीकरणाची क्षमता दुप्पट करता येईल काय? जरूर... सार्वजनिक तसेच खाजगी क्षेत्रातील कारखान्यांचा विस्तार केल्यास प्रत्येक कारखाना दोन कारखान्यांचे काम सहज करील. उदाहरणार्थ, एस्सोच्या मुंबईतील तेलशुद्धीकरण कारखान्याचा विस्तार केल्यास केवळ $\frac{1}{2}$ खर्चात एक संपूर्ण नवीन कारखाना उभारल्या इतकाच फायदा होईल.

एस्सो आहे व्यापारी संस्था. भारताचे हित तेच तिचेहि हित. १६० लक्ष टनांचा तुटवडा भरून काढण्याच्या कामात सर्वांनाच सहभागी होता येईल. सद्यःपरिस्थितीत भांडवल, यंत्रसामग्री व अनुभवी तंत्रज्ञ आणि कामगार यांचा जास्तीत जास्त व उत्तमात उत्तम उपयोग करून घेतला पाहिजे. पुढे येणाऱ्या जबाबदाऱ्यांमधून आपल्या वाट्याचे ओझे उचलण्याची एस्सोची तयारी आहे.

## एस्सो शक्तीची तूट भरून काढण्यास हातभार लावू शकेल.

ESSO
INDIA




अनुक्रमणिका




# सत्ता सत्ता सत्ता सत्ता सत्ता

—दादूमिया



ऑगस्ट महिना भारतीय इतिहासात क्रांतिकारक समजला जातो. या वर्षी काँग्रेस पक्षात या महिन्यात जो बखेडा माजलेला दिसला तो आणि त्यानंतरचे प्रकार मोठे लाजीरवाणे होते. सिंडिकेट विरुद्ध इंडिकेट हा मोठा अभूतपूर्व लढा आता चालू झाला आहे. इंदिराबाईंनी आपली सारी शक्ती पणास लावून पंचाहत्तर वर्षांच्या गिरींना राष्ट्रपती म्हणून डाव्या काँग्रेसवाल्या सभासदांबरोबर कम्युनिस्ट व कम्युनॅलिस्ट सभासदांची मदत घेऊन निवडून आणले. इंदिराबाईंनी एका स्त्री खासदारास "पॉवर अ‍ॅट् एनी कॉस्ट्" असे सूत्र सांगितल्याचे वृत्तपत्रात जाहीर झाले आहे. गिरींना एवढ्या उतार वयात ही "कॉस्ट्" काय आहे—विशेषतः कम्युनिस्ट व कम्युनॅलिस्ट् यांचे सख्य जोडल्यावर—हे काय कळले नसेल ? इंडिकेटचा तुफानी प्रचार पाहिल्यावर काही खासदारांनी जी शेपूट पायात घालून इंदिराबाईंच्या उमेदवारास गुप्त मतदान केले ते काय दाखविते ? आणि सर्वात कळस म्हणजे काँग्रेस टिकविण्याच्या दिखाऊ सबबीखाली सिंडिकेटच्या धुरंधरांनी 'मोरारजी गेले आहेत तर जाऊ द्या, आपण तर आपली जागा व सत्ता टिकवून धरू या', अशा स्वार्थी विचाराने "जगा व जगू द्या" असे पीछेहाटीचे धोरण स्वीकारले होते ते काय दर्शविते ?

केनेडी घराण्यात दोन केनेडींचे खून झाले. अमेरिकन इतिहासातील अमानुषतेचा तो कळस होता. तरीही त्याच घराण्यातील तिसरा भाऊ राष्ट्राध्यक्षाच्या जागेसाठी उभा राहिला. त्यास त्याबद्दल "तुला रे काय कमी आहे ? कशाला उभा राहून सुखाचा जीव धोक्यात टाकतोस ?" असे विचारताच त्याने काय उत्तर द्यावे ? तो म्हणतो, "तुम्हाला माहीत नाही की तेथे सत्ता आहे ?"

यावरून सत्तेची अभिलाषा भारतातच दिसून येते असे नाही. आफ्रिकेसारख्या मागासलेल्या खंडात आफ्रिकन काळ्या पुढाऱ्यात या सत्तेपायी खुनाखुनी होते ! विन्स्टन चर्चिल किंवा चार्लस् द गॉल तरी उतार वयात कोठे स्वस्थ बसले ? नासर, राजा सौद किंवा इराणचा शाह यांना आजूबाजूस हिंसेचे वातावरण दिसत असूनसुद्धा आपल्या स्थानांवर चिटकून राहण्याचे आकर्षण सोडवत नाही.

## सत्तेची अभिलाषा उपजतच

मानसशास्त्राप्रमाणे प्रत्येक लहान मोठ्या प्राणिमात्रास आपण कोठे तरी, केव्हा तरी व कुणावर तरी श्रेष्ठत्व संपादन करून सत्ता गाजवावी असे साहजिक वाटते. सत्तेची ही इच्छा या शास्त्रात "बेसिक् इन्स्टिंक्ट्" समजली जाते. अगदी लहानपणापासून पोरे आई-बापांची "दादागिरी" सहन करीत असतात. त्यावेळी आईबापांजवळ सत्ता आहे व म्हणून आपणांस त्यांचे ऐकावे लागते ही त्यांना बंडखोर पण सत्य जाणीव असते. बाबांची सत्ता आईहून श्रेष्ठ म्हणून बाबांचा दरारा जास्त !

दुसऱ्यास खाली पाडून त्याच्या छातीवर बसून त्यास ठोसे लगावण्याची रानटी वासना जगाच्या संस्कृतीच्या सुरवातीपासूनची आहे. "सत्ता" व "सामर्थ्य" यांचे लग्न पुरातन कालापासून लागलेले आहे. पूर्वीच्या काळी हे सामर्थ्य बहुधा स्नायूतच असावे लागे. राम-

**पूर्वी विद्येनेच मनुष्या जगामाजी श्रेष्ठत्व येत असे, आज 'विद्ये'ची जागा 'सत्ते'ने घेतलेली दिसते... भारताच्या (आणि जगाच्याही) राजकारणात आज 'सत्ते'मुळे कसे आणि किती उत्पात घडून येत आहेत त्यांची चित्रे सर्वांना दिसत आहेत... म्हणूनच यंदाच्या लोकसत्ताक दिनानिमित्त श्री. दादूमिया या विचारवंत राजकीय लेखकाचा 'सत्ते'चे कठोरपणे विश्लेषण करून दाखविणारा हा खास लेख...**












ठासांनी म्हणूनच "जयास वाटे जीवाचे भय तेणे क्षात्रकर्म करू नये । असे म्हटले आहे. शारीरिक बळाबरोबर युक्त्या-प्रयुक्त्या उपयोजिण्यासाठी बुद्धीबळाचीही आवश्यकता भासते. ह्या बळाच्या विषम विभागणीतून तर पुढाऱ्याचा जन्म होतो. लेचापेचा माणूस हे जिकीरीचे काम करण्यास आपण होऊन पुढे येणारच नाही. आणीबाणीच्या वेळी पुढाऱ्याचे जातिवंत गुण असलेले लोक आपो-आपच पुढे येतात. युद्धाची खरी कसोटी येताच चेंबरलेन मागे पडून चर्चिल पुढे येतो, मेनन जातो व यशवंतराव पुढे सरकतात आणि नहरूंच्या नेभळया धोरणाचे डीव्हॅल्यूएशन् होऊन लोकांना प्रखर व जाज्वल्य सावरकरवादाची आठवण होते.

सत्तेची पूजा कां केली जाते ? कारण कितीही वाईट व जुलुमी राज्य आले तरी त्या सत्तेतून काहीतरी चांगले जरूर निघते. जनता साधारणतः भोळी व मूर्ख असते. जनतेचे थोडेफार हित साधले की जनता स्वस्थ बसते व सत्ताधीशाची स्तुतिस्तोत्रे गाते. म्हणून वाईटात वाईट राजा काही तरी उपाय करून आपण लोकप्रिय आहोत असे भासविण्याचा प्रयत्न करतो.

## सत्तेचा उपयोग चांगलाही होतो

जास्त चांगल्या दानतीचा सत्ताधीश जास्त चांगले जनहित साधू शकतो. त्यासाठी अर्थातच त्याला जनताजनार्दनाचे व त्याच्या स्वतःच्या संघटनेचे साहाय्य असावे लागते. स्वतःची 'टीम' जी लागते ती एवढ्याच कारणासाठी. नाहीपेक्षा एखादा हट्टी आय. सी. एस. सेक्रेटरी मंत्र्याची हवा खराब करू शकतो ! गेल्या दोन वर्षात यशवंतरावांनी दिल्लीत बसून दोन चार बिनकाँग्रेसी मंत्रिमंडळे गडगडवली ती याच जोरावर !

चांगला व वाईट सत्ताधीश यांच्यात फरक कोठे व कसा आढळतो ? सत्ताधीशाचे खाजगी जीवन कसे आहे ते तो जनहित योग्य प्रकारे साधत असेल तर जनता ते तपासण्याच्या फंदात पडत नाही. सयाजीराव गायकवाड युरोपात जे उद्योग करीत त्यांचा बभ्रा झाला नाही. कारण त्यांनी बडोदे व बडोदेकर यांचा चेहरामोहरा बदलून टाकला. चांगला सत्ताधीश जनतेचे हित जास्त साधू शकतो. कारण त्याचा बराचसा वेळ वाईट सवयींत न जाता चांगल्या योज-नांच्या विचारात जातो. श्रीकृष्णाने सत्तेच्या जोरावर जनतेचा दुवा कसा मिळविला ? त्याने कालिया नागराजाचे मर्दन केले, गोपांचा अतिवृष्टीपासून बचाव केला, शिशुपालासारख्या मदांध शत्रूची हाडे मोडली व आसामांतील बंदीशाळेतून सोळा सहस्त्र नारींची सुटका केली ! "नर करणी करे तो नरका नारायण हो जाय" ही म्हण रामकृष्णांच्या चांगल्या कारकीर्दीची फलश्रुती सांगते. शिवाजी महाराष्ट्राचा उगीच देव झाला नाही. औरंग-जेबाने केलेला व रामदासाने वर्णन केलेला जुलूम वाचला की शिवाजीच्या थोरवीची कल्पना येते. मर्द शिवाजीने शून्यातून चार जिल्ह्यांचे मराठी राज्य स्थापिले. त्याचे बाजीरावाने आपल्या समर्थ समशेरीने मराठी साम्राज्यांत रूपांतर केले. सत्तेच्या जोरावर मराठ्यांनी सर्व भारतीय हिंदूना जुलुमातून सोडविले. हिंदूंना परत स्वातंत्र्याचा प्राणवायू ह्या वीरांनी मिळवून दिला. शिखांनी ह्याच सत्तेच्या जोरावर उत्तर हिंदुस्थानातील हिंदूंना मुसलमानी छळापासून, जिझिया करापासून, लाचारीपासून, गुलामीपासून मुक्त केले व दुबळ्या हिंदूना "शेर" उर्फ "सिंग" बनविले.

ब्रिटिशांनी हाती आलेल्या सत्तेचा राजकीय व आर्थिक स्वार्था-साठी कदाचित दुरुपयोग केला असेल. पण सामाजिक, सांस्कृतिक व धार्मिक आघाड्यांवर त्यांनी शक्य तेवढा न्याय देऊन शत्रूच्या जनतेचा दुवाच मिळविला आहे. काँग्रेसला हे साधले नाही. म्हणूनच भारताची ब्रिटीश अंमलाखाली शैक्षणिक वा सांस्कृतिक प्रगती मंदावली नाही. मात्र त्यांनी औद्योगिक विकास येथे वृद्धींगत होऊन दिला नाही. त्यामागे त्यांचा आर्थिक स्वार्थ आड येत होता.

## काळ्या ढगाची रूपेरी कडा

हिटलरला दोस्त राष्ट्र भले खलपुरुष समजोत. त्याने जर्मन राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीत आमूलाग्र बदल घडवून आणला. पहिल्या महायुद्धानंतर दोस्त राष्ट्रांनी जर्मनीस भुईसपाट केले होते व जर्मन राष्ट्राने पुनश्च पन्नास वर्षांत डोके वर करू नये यासाठी पराकाष्ठा केली होती. हिटलरजवळ अनियंत्रित सत्ता होती पण त्याने आपली सारी शक्ती त्या राष्ट्राचा विकास व उद्धार कर-ण्यात खर्च केली. दुसऱ्या महायुद्धानंतर जपान व जर्मनी या राष्ट्रांचा संपूर्ण विनाश घडला. तरीही वीस वर्षात ह्या राष्ट्रांच्या प्रबळ सत्ता-धिकाऱ्यांनी ती सत्ता योग्य त्या मार्गाने वापरून त्या त्या राष्ट्रांना मानाचा दर्जा प्राप्त करून दिला. चीन व इस्राइल या दोन राष्ट्रांचा इतिहास त्या दृष्टीने अभ्यास करण्यासारखा आहे. ह्या दोन राष्ट्रांनी अक्षरशः शून्यातून विश्व निर्माण केले आहे व ही राष्ट्रे आज त्यांच्या शत्रूंना भारी होऊन बसली आहेत. सत्तेच्या अनियंत्रित जोरावर राष्ट्रवाद जनतेत जागृत करून स्वराष्ट्राची अस्मिता व अर्थतंत्र विकासास लावण्याचे या सर्व राष्ट्रांचे कसब इतर मागासलेल्या राष्ट्रांनी जरूर अभ्यास करण्यासारखे आहे.

तुर्कस्थान एके काळी असेच गुलामगिरीने पिचून मेलेले, खचून गेलेले मागासलेले राष्ट्र होते. त्या राष्ट्राच्या सद्भाग्याने त्या राष्ट्राची धुरा केमाल पाशा याच्या हाती आली व त्या राष्ट्राचे संपूर्ण रूपांतर झाले. आज तुर्कस्थान आशियन राष्ट्र वाटतच नाही, युरोपियन राष्ट्रच वाटते. या हुकूमशहाने शरीयत कायदा एका रात्रीत झुगारून लावला. पडद्याआड सडणाऱ्या तुर्की स्त्रीचा बुरखा त्याने कायद्याने फाडून टाकला व तुर्की स्त्रीस समतेचे हक्क बहाल केले. अरबीच्या ऐवजी तुर्की भाषा राजभाषा केली. इतकेच नाही तर कुराणदेखील अरबीऐवजी तुर्की भाषेत म्हटले पाहिजे असा फतवा काढला व तो भंग करणाऱ्यास कडक शिक्षा ठोठावल्या !. कुराणनिष्ठ शाळा बंद केल्या व पाश्चिमात्य पद्धतीवर शास्त्रीय शिक्षण सुरू केले. शासन व धर्म यांचा घटस्फोट करवून शुक्रवारा-ऐवजी रविवारी सरकारी सुट्टी जाहीर केली. मशिदीत प्रार्थनेच्या वेळी सुरेल संगीताचे स्वर चालू ठेवण्याची व्यवस्था केली.

धर्मनिष्ठ, अडाणी व रूढीप्रिय लोकांना आधुनिक शिक्षण








वीस वर्षांत देण्याची किमया केमाल पाशाने कशी साध्य केली ? अर्थात् अमर्याद सत्तेच्या जोरावर. केमाल पाशास मध्यंतरी लोकशाहीचा प्रयोग करण्याची कुबुद्धी सुचली. त्यासाठी त्याने लिबरल रिपब्लीक पक्ष स्थापिला. पण त्यास काय आढळले ? भिन्न पक्षांच्या सभा भरू लागल्या, पण त्या उधळल्या जाऊ लागल्या. तेथे सर्वत्र मारामाऱ्या, रक्तपात व पिस्तुलबाजी चालू झाली. लोकांनी स्वातंत्र्याचा विपरीत अर्थ लावला. शेतकरी सारा देईनात, अधिकाऱ्यांना सर्वत्र मार मिळू लागला, कुर्द व अर्मेनियन टोळ्यांनी सशस्त्र उठाव केला व शेख अहंमद या दरवेशाने आपण परमेश्वराचा अवतार आहोत असे जाहीर करून बुवाबाजी चालविली. केमाल पाशास हा सारा गोंधळ असह्य झाला. त्याने शेकडो जणांना पकडून फाशी दिले, कम्युनिस्ट बंडखोरांचा बीमोड केला व स्वराज्यात पुनश्च स्थैर्य व शांतता नांदू लागली. अर्थात् हे सारे त्यास केवळ सत्तेच्या मदतीने साध्य होऊ शकले.

नाण्याच्या दोन बाजू असतात. एक चांगली व दुसरी वाईट. त्याप्रमाणे सत्तेची दुसरी बाजू आहे. सत्ता दारूप्रमाणे डोक्यात चढते व त्या कैफात माणूस वेड्यासारखा वागू लागतो. त्याचा तोल सुटतो. तो उद्धट होतो, त्याची भाषा उद्दाम व अपमान करणारी होते, पुढाऱ्यास लागणारे मार्दव व नम्रपणा दूर पळतात आणि हा सत्ताधीश उमट व म्हणून इतरांच्या द्वेषाचे कारण होऊन बसतो. इतर वडीलधाऱ्या मंडळींचा मान ठेवला जात नाही. त्याच्या भोवती असलेली चांडाळचौकडी जे सांगेल तेच सत्य, असे त्या सत्ताधीशास वाटू लागते व सारी पृथ्वी आपल्यापुढे कःपदार्थ भासू लागते. भोगाची लालसा शतपट वाढते व त्यामुळे ज्यांना आया बहिणी म्हणून पूर्वी आदर दिला जात असे त्यांचा फक्त भोग्य चीजा एवढाच विचार नवीन मनूत केला जातो. स्वतःच्या पायांवर पांघरूण घालण्यासाठी व स्वतःच्या आप्तांना वर आणण्यासाठी पैशांची चणचण भासू लागते. भोग व स्वतःच्या पापांचे आणि आप्तांचे समर्थन करण्यासाठी पैसा वाममार्गाने गोळा केला जातो. हा चालता बोलता अहंकार लोकांना छळण्यातच समाधान मानू लागतो.



गरिबांची "चैन" होणार !

अबलांचे करुण आक्रोश, बालांचे विलाप व वृद्धांचे हळहळणे ऐकून या मंदांधांचे हृदय द्रवत नाही.

सत्तेने माणसाचे असे परीवर्तन कां होते ? सत्तेचा गैरवापर अमुकच व्यक्ती करते व अमुक करत नाही याचा अर्थ काय ? चांगले लोक सत्तेचा चांगला उपयोग करतात हे तरी कुठे खरे आहे ? रावण हा वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण मोठा विद्वान पंडित होता. कर्णासारखा उदार क्षत्रिय तर दुसरा शोधून मिळणार नाही. औरंगजेबाचे साधेपण, धर्मनिष्ठा, भक्ती वगैरे गुण प्रशंसनीय होते. संभाजीचे देशप्रेम, धडाडी व धर्मासक्ती जाज्वल्य होती यात संशयच नाही. बडोद्याचे कै. प्रतापसिंगराव गायकवाड उदार, दिलदार व सरळ मनाचे होते. फार काय १९३९ सालपर्यंत त्यांनी दारूच्या एका थेंबासही स्पर्श केला नव्हता ! हिटलरने सारे आयुष्य स्वराष्ट्राच्या उद्धारार्थ वेचले. स्टालीनला वाईट सवयी जवळजवळ नव्हत्याच. रशियाचे पुनरुज्जीवन हेच त्याचे व्यसन होते. या सर्व वैय्यक्तिक रीतीने धर्मनिष्ठ, दिलदार व शुद्ध मनाचे पतन सत्ता कसे घडवून आणते हे पाहणे मोठे मनोरंजक ठरेल.

पूर्वी सत्ता वंशपरंपरा प्राप्त होई. ब्राह्मणाचा मुलगा विद्येच्या सत्तेची 'मोनोपोली' धारण करी, क्षत्रिय राजपुत्र क्षात्र सत्तेची 'मोनोपोली' राबवीत असे व वैश्याच्या हाती वंशपरंपरा संपत्तीचे केंद्रीकरण होई. तेथे लॉटरीप्रमाणे सत्तेची वा संपत्तीची शाश्वती नसे. जर राजपुत्र वाईट चालीचा निघाला तर त्यास काढणे अशक्य होते. बऱ्याच वेळी अशा राजपुत्रांना नियंत्रित करीत दुसऱ्याच व्यक्ती ! जहांगीराची खरी सत्ता त्याच्या पत्नीच्या-नूरजहॉंच्या हाती होती. नेपाळच्या राजधानीत राणा लोक खरे राजे बनले होते. त्रावणकोर संस्थानात राजा फक्त देवधर्म करण्यासाठी अस्तित्वात होता. त्या राजाचा राजा त्याचा दिवाण सर सी. पी. रामस्वामी होता ! सत्ता स्त्रीप्रमाणे समर्थ व्यक्ती 'मालक' म्हणून शोधून काढते. मूल होत नसले की दत्तक घेतात. व्यक्ती समर्थ नसली की सत्तेच्या राज्यात दत्तक प्रकरण सुरू होते.

लोकशाहीचा सर्वात मोठा फायदा हा की कंटाळा आला, जुलुमाचा अतिरेक होऊ लागला की जनता सत्ताधीशास फेकून देऊ शकते. पूर्वी हे नियंत्रण यमराजाच्या हाती होते. आज हे नियंत्रण जनताजनार्दन करतो. ह्या दृष्टीने आशिया व आफ्रिका खंडातील लोकशाही वेगळी वाटते. लोकशाहीत प्रत्येक मतदार निदान सत्तेवर कोण येणार त्या बाबतीत जागृत व सुशिक्षित असावा लागतो. जेथे ८०-८५ टक्के जनता अडाणी व शेळ्या मेंढ्यांप्रमाणे अंधभक्त असते तेथे नेहरू, सुकर्ण वा नासर वीस वीस वर्षे गादीवर चिकटून बसतील यात नवल ते काय ? युद्ध जिंकणाऱ्या विन्स्टन चर्चिलला इंग्लंडसारखी सुशिक्षित व जागृत जनताच सत्तेवरून खाली खेचू शकते. इंग्लंड जर भारत असते तर आज पंतप्रधान म्हणून सारा चर्चिलची नेमणूक दहा डाऊनिंग स्ट्रीटवर झालेली आढळली असती.

(पृष्ठ ६१ वर पहा)











अनुक्रमणिका

# माझ्या माहितीचे माडखोलकर

**महाराष्ट्रातलि सुप्रसिद्ध साहित्यिक अन् पत्रकार श्री. ग. त्र्यं. माडखोलकर याना दि. २८ डिसेंबर १९६९ रोजी सत्तर वर्षे पुरी झाली. त्याप्रीत्यर्थ त्यांचे हे एक आगळे व्यक्तीचित्र . . .**



—अरविंद ताटके

श्री. ग. त्र्यं. माडखोलकरांना मी प्रथम पाहिले १९४० साली. त्यावेळी कवि यशवंतांबरोबर ते ठाण्याला आल्याचे आठवते. त्यांची प्रत्यक्ष ओळख मात्र १९५१ साली कारवार साहित्य-संमेलनाला जाताना 'साबरमती' बोटीत झाली. मी तेव्हाचे नवशक्तीचे संपादक प्रभाकर पाध्ये यांच्याशी गप्पा मारीत असताना त्यांनीच माडखोलकरांशी माझी ओळख करून दिली. व्यक्तिमत्वाच्या दृष्टीने चाळीस सालचे माडखोलकर अन् बोटीतले माडखोलकर यांच्यात जमीन-अस्मानाचे अंतर भासल्याने मी प्रथम त्यांना ओळखूही शकलो नाही. गांधीवधोत्तर झालेल्या दंगलीची—जाळपोळीची झळ त्यांना लागलेली होती. त्यातून ते थोडे सावरतात तोच पत्नीनिधनाचा घावही काही वर्षांनी त्याना सोसावा लागला होता. त्यामुळे त्यांचे दर्शन मला वेगळेच भासले. त्यांचा बोलका चेहरा मात्र कायम होता अन् संभाषणात त्यांचे बुद्धीतेजही तेजाळलेलेच दिसत होते.

कारवारला संमेलनात भोजन-प्रसंगी पंगतीत दोनदा माडखोलकर माझ्याशेजारीच येऊन बसल्याने मला त्यांच्याशी गप्पा मारण्याची संधी अनायसेच लाभली. गोड शब्दात त्यांनी माझी सारी माहिती आधी विचारून घेतली. नंतर आपली सारी घरगुती माहितीही त्यांनी मोकळेपणाने मला सांगितली. मनमोकळेपणा हा त्यांच्या स्वभावाचा खास गुण म्हणून सांगता येईल. जेवताना आमच्या समोरच त्यांची दोन मुले — चंद्रशेखर व मीनाक्षी बसली होती. त्यांच्याकडे बोट दाखवून "ही माझी मुले!" असा उल्लेख त्यांनी केला. सहज बोलण्याच्या ओघात "माझ्या घरी याल का?" असे मी त्यांना विचारले. तेव्हा "मी मुंबईस आलो की बहुधा वा. रा. ढवळ्यांकडे अगर डॉ. भालेरावांकडे उतरतो. येण्यापूर्वी मी तुम्हाला पत्र टाकीन. मग मला तुम्ही भेटलात की मी येईन की तुमच्याकडे" असे बोलून त्यांनी माझे निमंत्रण अगदी सहज स्वीकारले. या गोष्टीला चौदा वर्षे उलटून गेली अन् आम्ही दोघेही एकमेकाना पार विसरून गेलो. रियासतकार सरदेसायांवरील माझा लेख 'महाराष्ट्र टाईम्स'-मध्ये प्रसिद्ध झाल्यावर पुन्हा आमची दोघांची भेट झाली ती त्यांचे परमस्नेही उभाकांत भेंडे यांच्या घरी. जवळजवळ एक तपानंतर मी त्यांना पुन्हा भेटत होतो पण माडखोलकरांचा गप्पिष्ट स्वभाव तसाच कायम होता अन् गप्पा मारताना वयाच्या अंतराची भिंत आमच्या आड मुळीच आलेली नव्हती. साहित्यविषयक जुने वाद, नामवंत साहित्यिकांच्या स्वभावातल्या खोड्या, अन् मराठी वाङ्मयातल्या अनेक गमतीजमती ते दिलखुलासपणे सांगत होते. जाहीर व्याख्यानात त्यांचे भाषण कसे वठते त्याची कल्पना मला नाही. पण खाजगी बैठक माडखोलकर आपल्या संभाषणकुशलतेने गाजवून सोडतात. एकदा त्यांचे दुसरे बालस्नेही प्रा. वि. ह. कुलकर्णी यांच्या घरी झालेल्या अशाच एका बैठकीच्या वेळी भेंडे—माडखोलकर अन् कुळकर्णी यांच्या काव्यशास्त्रविनोदाच्या मैफलीची मजा लुटण्याची संधी मला लाभली होती. माडखोलकरांचे वैशिष्टच हे की ते जसे स्वतः बोलतात तितक्याच कळकळीने अन् शांतपणे ते दुसऱ्याचे बोलणेही ऐकावयास तयार असतात. याखेरीज त्यांचा आणखी एक गुण सांगण्यासारखा आहे. (आमच्याकडील पत्रकारात तो गुण बराच दुर्मिळ आहे.) खाजगी पत्राला उत्तर देण्यात ते कमालीचे तत्पर आहेत. पत्रातून हवी ती माहिती तर ते पुरवतीलच शिवाय आणखी माहिती अन्यत्र कुठे मिळेल त्याची खबरही ते पत्रातून








देण्यास विसरत नाहीत. मुंबईला ते यायचे असले की बहुधा त्यांचे पत्र मला येते. अलीकडे बरीच वर्षे ते भेंडयांकडेच उतरत. पण भेंड्यांच्या निधनोत्तर (१९६६) त्यांची मुंबईतली निवासस्थानेही बदलत गेली. तिथे त्यांना भेटण्यास गेले की त्यांच्या भोवताली अनेक मंडळींचा दरबार भरलेला असतो. दोन शब्द त्यांच्याशी बोलायास मिळतील तर शपथ. त्यांनाही त्याची जाणीव असते. उठताना ते सहज म्हणतात मग, "पहा ताटके, आता नागपूरलाच या. म्हणजे मग पुष्कळ गप्पा मारता येतील. तिथं मला भरपूर वेळ असतो" मुंबईचीच परिस्थिती नागपुरास असेल या जाणिवेने नागपुरास जाण्याचे मी अजून तरी टाळले आहे. असे असले तरी महाराष्ट्रातला एवढा मोठा साहित्यिक अन् पत्रकार किती साधेपणाने वागतो म्हणून कुणाकडे बोट दाखवायचे झाल्यास माझ्या डोळ्यापुढे प्रथम माडखोलकरांचेच नाव उभे राहील.

## राजकीय कादंबरीकार

जवळजवळ चार तपे आपला पत्रकाराचा पेशा सांभाळून माडखोलकरांनी विविध तऱ्हेचे वाङ्मयही विपुलपणे लिहिले आहे. अलीकडच्या काळात चटका लावणारे मृत्युलेख लिहिणाऱ्या दोनच व्यक्ती आपल्याकडे झाल्या. एक आचार्य अत्रे अन् दुसरे आमचे माडखोलकर. मुंबईत असल्याने अत्र्यांच्या मृत्युलेखांचे कौतुक जास्त झाले. नागपूरचा 'तरुण भारत' त्या मानाने महाराष्ट्रातल्या लोकांना दूरचाच. त्यामुळे सामान्य वाचकवर्गाला माडखोलकरांनी लिहिलेल्या सरस मृत्युलेखांची कल्पना येणे कठीण. पण ज्यांना वृत्तपत्रे वाचण्याचा खरा नाद आहे अशा व्यासंगी वाचकांना त्यांनी लिहिलेल्या मृत्युलेखांच्या मौलिकतेची कल्पना निश्चित आहे. पत्रव्यवसाय सांभाळून विपुल ग्रंथरचना करणारे म्हणून ज्याप्रमाणे तात्यासाहेब केळकर आणि आचार्य अत्र्यांचा सर्वत्र गौरव होतो त्याप्रमाणे माडखोलकरांनीही वृत्तपत्राचा दैनंदिन धबडगा सांभाळून विपुल, अन् केव्हांही वाचनीय ठरावे असे वाङ्मय निर्माण केलेले आहे याची साक्ष त्यांच्या ग्रंथसंभाराकडे नजर टाकल्यास पहावयास मिळते. राजकीय कादंबरीकार म्हणून त्यांचे नाव महाराष्ट्रात सदैव मशहूर राहील त्याप्रमाणे तरुण मनाला गुदगुल्या करणाऱ्या शृंगारिक कादंबऱ्या लिहिणारे म्हणूनही त्यांचे नाव जगजाहीर आहे. टीकाकार म्हणूनही त्यांचे नाव सर्वश्रुत आहे अन् विष्णुशास्त्री चिपळूणकरांवरील त्यांच्या निबंधाने उच्च दर्जाचे निबंधकार म्हणूनही त्यांना मोठ्या मानाचे स्थान लाभलेले आहे.

माडखोलकरांनी आपला 'आधुनिक-कविपंचक' हा छोटा ग्रंथ १९२१ साली वयाच्या अवघ्या बावीसाव्या वर्षी लिहिला. या पुस्तकाला तात्यासाहेब केळकरांची सुन्दर प्रस्तावना असून त्यात त्यांनी पुस्तकाविषयी पुढील गौरवोद्गार काढलेले आढळतात: 'हे पुस्तक जो चित्त लावून वाचील त्याला अखंड आधुनिक मराठी काव्यपटाचे धागेदोरे समजण्यास त्याची अतिशय मदत होईल. कारण समकालीन कवींची मने हे एक परस्पर गुंतागुंतीचे मोठे जाळेच असते आधुनिक कवींसंबंधाचे विशेष परिश्रम घेऊन लिहिलेले विवेचनपर असे हे माझ्या समजुतीने पहिलेच पुस्तक होय व या दृष्टीने रसिक वाचकवर्ग याचा अभिनंदनपूर्वक स्वीकार करतील अशी आशा आहे' केळकरांसारख्या साहित्यसम्राटाने एका तरुण मुलाची अशी वाखाणणी करावी यातच माडखोलकरांच्या लेखणीचे अन् परिश्रमाचे वैशिष्टय पहावयास मिळते. रेव्ह. टिळक, केशवसुत, विनायक, (वि. ज. करंदीकर) गोविंदाग्रज, (गडकरी) बाल कवी (ठोमरे) या मराठी वाङ्मयात गाजलेल्या पाच थोर कवींच्या कवितेचे रसग्रहण तरुण माडखोलकरांनी इतक्या रसिकतेने अन् चिकित्सकपणे केले आहे की मराठी काव्याच्या अभ्यासकांना प्रस्तुत पुस्तक वाचल्याशिवाय गतीच नाही.

## 'मुक्तात्मा'ने नवे दालन उघडले

त्यांची पहिली गाजलेली कादंबरी 'मुक्तात्मा' ही होय. ती त्यांनी १९३३ साली लिहिली. मराठी कादंबरीत राजकीय प्रवाह आणण्याचा प्रथम हक्क त्यांना या कादंबरीमुळेच मिळाला. 'मुक्तात्मा' ही त्यांच्या मुंबईतल्या पूर्वायुष्यातल्या अनुभवांवर लिहिली असल्याने त्यामुळे मुंबईतल्या एका प्रसिद्ध गटाचा पित्तप्रकोप झाला व त्याचेच पर्यवसान 'बंधात्मा' कादंबरी प्रसिद्ध होण्यात झाले. या कादंबरीत माडखोलकरांवर बरीच छुपी टीका आहे. या गोष्टी सोडल्या तरी राजकीय मराठी कादंबरीच्या प्रांतात माडखोलकरांनी या कादंबरीने आपले खास सिंहासन उभारले यात शंका नाही. ही कादंबरी त्या काळी अतिशय गाजली तरी काही साहित्यिकानी तिच्यावर टीकाही केली. माडखोलकरांची भाषा त्या काळी बरीचशी संस्कृतप्रचुर असल्याने (आणि अजूनही त्यात फारसा फरक झालेला नाही) वि. स. खांडेकरांनी त्यावेळी लिहिले— 'निबंधाची भाषा आणि कादंबरीची भाषा यात दोन ध्रुवांइतके अंतर असते ही साधी गोष्ट काही गजाननरावांना कळली नाही. तेव्हा ती कळेपर्यंत कादंबरी लेखनाच्या फंदात त्यांनी न पडलेले बरे!' आचार्य अत्र्यांनी त्यावेळी 'वायुपुत्र' या टोपण नावाने टीका श्री. प्र. श्री. कोल्हटकरांच्या 'संजीवनी' साप्ताहिकातून पुढीलप्रमाणे केली होती— 'माडखोलकरांची ही कादंबरी मी मोठ्या जिज्ञासेने वाचायला हाती घेतली; पण पहिली दोन तीन पाने वाचल्यावर मला अशी काही हुडहुडी भरली की मी ती मुकाटयाने धाबळीत गुंडाळून ठेवून दिली. मला वाटले, हा जडबंबाळ लेखक कशाला कादंबरीच्या वाटेला गेला?" भाई डांगे यांचा माडखोलकरांशी वैयक्तिक स्नेह असल्याने त्यावेळी डांग्यानी त्यांना म्हटले — "आमच्या चळवळीचे सुरुवातीचे काही प्रसंग तुम्ही आपल्या कादंबरीत चांगले वर्णन केले आहेत" एकंदरीत या कादंबरीवर त्या काळी विशेषत: मुंबईत टीकेची झोड उठली होती तरी राजकीय कादंबरी म्हणून तिचे स्थान कसे श्रेष्ठ होते व आहे ते डांगे यांच्या उद्गारांवरून सहज लक्षात येते. त्यानंतर

(पान ६३ वर पहा)






# आज अचानक गाठ पडे

**'दीपावली'ने १९६८ साली दिवाळी अंकासाठी आयोजित केलेल्या खास कादंबरी स्पर्धेत प्रथम क्रमांकाचे पारितोषिक मिळविणारे आणि चोखंदळ समीक्षकांनी मुक्त कंठाने गौरविलेल्या कादंबरीचे लेखक श्री. प्रभाकर पेंढारकर यांच्या गुळगुळीत भाषाशैलीतील ही दुसरी कादंबरी....**



## [१]

प्रथमच हे मान्य करतो की मला व्यवहार थोडा कमी समजतो. पण ह्याचा अर्थ असा नव्हे की इतर समजतात तेवढा मी 'भावडा' आहे. (सभ्यता न सोडता दुसऱ्याला 'मूर्ख' म्हणायचं झालं की लोक भावडा हा शब्द वापरतात.) बायकोच्या मते मी असा माणूस आहे की ज्याला कुणीही बनवावं. (अर्थात मला 'बनवणारी' पहिली ती—ह्याचा तिला हे विधान करताना विसर पडलेला असतो ! )

माझे अगदी जवळचे मित्र आहेत ते असा काही आडपडदा ठवत नाहीत. सरळ सरळ ते सांगून टाकतात, "लेका, तू महामूर्ख आहेस. अशा दिवसात शिवाजीपार्कचा उत्तम ब्लॉक तू फुकाफुकी सोडलास आणि फिरून गिरगावातल्या डबल रूममध्ये रहायला आलास—हा मूर्खपणा नाही तर काय आहे ?"

ह्यांची मी समजूत काढू शकत नाही. अगदी माझ्या प्रिय बायकोलाही मी ह्या बाबतीत काही सांगू शकत नाही.

पण हे मी मनातल्या मनात किती दिवस ठेवणार ? कुठं तरी माणसाला आपलं मन उघडं करावंच लागतं. आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी कुणाजवळ तरी सांगाव्याशा वाटतात. आणि ज्यावेळी मित्र-मंडळीही परकी होतात तेव्हा तुम्हासारखी अपरिचित माणसं जवळची वाटू लागतात.

कोठून सुरुवात करू ? माझ्यासमोर टांगलेला फोटो दिसतो आहे ना. तेथूनच सुरुवात करू या ! हा फोटो मीच घेतलेला. कसा दिसतो ? तुम्ही काय म्हणाल—मला माहीत आहे. सुरेख, एकदम लाजवाब ! पण ही तरुणी कोण ?

तेच सांगायचं आहे. त्या तरुणीकडे पाहिलं की अद्यापही मी व्याकूळ होतो. छातीत कुठं तरी अद्यापही सूक्ष्म कळ उठते ! नाही, तशी काळजी करू नकात. मी काही हृदय विकाराचा पेशंट नाही. माझं ब्लड प्रेशरही अगदी 'नॉर्मल' आहे. पण कधीकधी वाटतं की ह्या फोटोतील तरुणी माझ्याकडे पाहून मोहक हसते आहे, टप्पोरे

डोळे मिचकावते आहे, त्या गोऱ्या गालावर गुलाबी छटा पसरते आहे आणि माझ्या हृदयाचा ठोका चुकतो.

तुमचाही चुकला असता, तुम्ही माझ्या जागी असता तर –!

ह्या फोटोकडे पहायचं आणि असं तळमळायचं–ही शिक्षा आहे मला ! तुम्ही म्हणाल की मग लावलात कशाला फोटो ? मी लावला– ? लावला आमच्या सौभाग्यवतींनी ! त्यांना वाटतं की मी आजवर काढलेल्या फोटोत तो एक उत्तम फोटो आहे. आणखीन्ही एक वेगळं कारण आहे. पण ते तुम्हाला ओघानं समजेलच !

मला कल्पना आहे. तुम्ही उतावीळ झाला आहात. तुम्हांला विचारायचंय्–त्या तरुणीचं नाव काय ? ती रहाते कुठं ? तुम्हांला भेटली कुठं ? – सांगतो. सारं क्रमाक्रमानं सांगतो.

राणीच्या बागेत आणलेल्या नव्या वाघिणीचे एन्लार्जमेंट मी 'रीटच्' करत बसलो होतो आमच्या नव्या जागेत ! रेडिओवर गाणं लागलं होतं.

आज अचानक गांठ पडे
भलत्या वेळी भलत्या वेळी
असता मन भलतीच कडे आज अचानक.

बायको स्वयंपाक घरात तळत असलेल्या भज्यांचा खमंग वास येत होता. त्यातली दोन भजी घेऊन ये म्हणून तिला हाक मारणार इतक्यात बेल वाजली.

मी उठलो आणि दार उघडलं. दारात ही. . फोटोतली परी. . उभी ! एकदम मला पाहून अशी लाजली. अशी लाजली. ! मग खालीवर, इकडे तिकडे पहात, डोळ्याला डोळा न भिडवता तिनं विचारलं,

"मिसेस परांजपे आहेत ?"

"हं, हो आहेत !"

परत ती लाजली. अशी भांबावून गेली की काही विचारू नका. मी आपला तिच्याकडे पहातच राहिलो.

मी तिला विचारलं, "काही सांगायचं आहे त्यांना !"

लाजत लाजत ती म्हणाली, "मला आत यायचं होतं. पण तुम्ही. !"

"मी काय ?"

"दारातच उभे आहात !"

ओ हो ! मी बाजूस झालो, तशी ती लाजत लाजत, भुरंकन खारीसारखी मला ओलांडून स्वयंपाकघरात दिसेनाशी झाली.

परत खोलीत आलो आणि वाघिणीच्या मिशा जरा स्पष्ट करू लागलो. डोळे फोटोवर होते पण कान स्वयंपाकघराकडे ! हळूच हात लांबवून रेडिओ जरा हलका केला. आतून मंजूळ आवाजात प्रश्न ऐकू आला.

"अंग तुझे मिस्टर घरी कसे आज ? ऑफिसला नाही गेले ?"

"त्यांचं ऑफिस म्हणजे न्यूज पेपरचं ऑफिस. जातील आता, ते फोटो रीटच् झाले की !"

"मला बाई बिलकुल कल्पना नव्हती ते घरी असतील म्हणून !"

"मग काय झालं त्यात ?" आणि बायको आवाज चढवून म्हणाली,

"अहो त्या रेडिओला काय झालं ? आवाज मोठा करा ना !"

कपाळ आमचं ! मी रेडिओ मोठा केला. मघाचं कुमार गंधर्वांचं गाणं संपत आलं होतं. पण आता मला त्यात गोडी राहिली नव्हती.

"निसटून जाई संधीचा क्षण
सदा असाच संकोच नडे
आज अचानक गांठ पडे ।।"

अगदी खरं आहे. मी स्वतःशीच म्हणालो.

एक डोळा हातातल्या फोटोवर, दुसरा स्वयंपाकघराकडे. मी आपला पहात होतो. तीन चार मिनिटांनंतर एक झाकलेली बशी घेऊन त्या परीला मी जाताना पाहिलं. तत्परतेनं उठून मी दार लावणार होतो. तेवढ्यात तिच्या मागून बायकोच आल्यानं माझा नाइलाज झाला.

फोटोत काही लक्ष लागेना. तेव्हा बायकोला हाक मारून मी भजी आणायला सांगितली.

बायको भजी घेऊन परत आली तसा मी तिचा हात धरला. "हे काय ?"–म्हणून बायको हात सोडवू लागली तसा मी म्हणालो,

"काय झालं ? ही काय जुनी चाळीतली खोली आहे आपली ?– 'कुणी पटकन् पाहला ?" ब्लॉक आहे हा !"

"पण म्हणून काय झालं ?"

"बस तर खरी !"

"आज बायकोबद्दल भलतंच प्रेम वाटू लागलंय् !" बायको शेजारच्या खुर्चीवर बसली.

मी एक भजं तिच्या तोंडात ढकललं, दुसरं माझ्या ! मग प्रश्न विचारला–

"हं मला सांग, मघाशी कोण आली होती ?"

"माझी मैत्रिण !"

"हो, पण तिचं नाव काय ? रहाते कुठं ?"

"अहो पण तुम्हांला काय करायचं ?"

"सांगशील तर खरी–!"

"तिचं नाव सुरेखा ! रहाते शेजारच्या ब्लॉकमध्ये !"

"म्हणजे समोरच्या का बाजूच्या ?"

"तुमच्या तरी फारच चौकशा ? कशाला हवी ही सगळी माहिती तुम्हाला ?"

तुमचं मला माहीत नाही, पण माझ्या मनात येतं ते सगळं मी बायकोला सांगून टाकतो. काही आडपडदा नाही. लग्नात आपण तशी शपथच घेतलेली असते. (आता ती आठवत नाही हे सोडा ! )

मी म्हणालो, "आजवर तुझ्या मैत्रिणींसाठी कमी वेळा का मी दारं उघडली. .ती सुमी. .कुंदा. .कमी. पण ह्या वेळेलाच मी का चौकशी करतो आहे ?"

"कां– ?"

"हे पहा, तुझी कोणतीही मैत्रिण मला पाहून अशी लाजलेली मला आठवत नाही. ही तुझी सुरेखा–काय लाजते, काय भांबावते !"

"बरं लाजू दे !"

"उगीचच, कारणाशिवाय ?"






"का, काय झालं ?"

"नाही म्हणजे. .उगीच आपलं नसलेलं एखाद्याच्या मनात यायचं !"

"काय मनात यायचं !"

"मनात यायचं. .म्हणजे. .एखाद्या वेळी माणूस अशा वागण्यानं तिच्या प्रेमात पडायचा !"

"माणूस पडायचा ना ! तुम्ही तर नाही !"

"म्हणजे मी काय माणूस नाही !"

"मग पडा !"

–बायको म्हणाली ! आणि भज्यांची रिकामी बशी उचलून निघून गेली.

# [ २ ]

चार दिवसानंतरची गोष्ट !

दिवा मालवला आणि मी बिछान्यात शिरणार इतक्यात लक्षात आलं की शेजारच्या बिल्डींगमधील ट्यूब लाईटचा प्रकाश खिडकीतून आमच्या खोलीत येत होता. मी खिडकीवर पडदा सरकवला.

बायको खुदकन हसली. का हसली ते मला समजलं. आमच्या लग्नानंतरची सहा वर्षं गिरगावातल्या डबलरूममध्ये काढली आम्ही ! उजेडच काय, येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांचे आवाजही खोलीत येत रहायचे ! आता ह्या नवीन ब्लॉकमध्ये आलो तसा बाहेरचा प्रकाशही नकोसा वाटू लागला होता.

बिछान्यात मी बायकोजवळ सरकलो. तिचा हात हातात धरला आणि तिला माझ्याकडे ओढून घेतले. तिच्या कानाचा हलकेच चावा घेत मी म्हणालो,

"ए– !"

बायको फिरून खुदकन हसली. त्या हसण्यानं माझा एकदम 'मूड' उतरला.

"कां, हसायला काय झालं ?"

"मला किनई तुमचं लक्षण काही ठीक दिसत नाही !"

तिचे शब्द ऐकून मी चमकलोच. तिच्यापासून जरासा दूर होत मी म्हणालो,

"का बुवा काय केलं आम्ही ?"

"काही नाही !"

"मग–?"

"तरीही सांगते, तुमचं लक्षण काही ठीक दिसत नाही ! गेले चार दिवस मी पहात आहे. बहुतेक वेळ तुम्ही घरीच असता ! ऑफिसातून परस्पर सिनेमाबिनेमाला जात नाही. सरळ घरीच येता–आणि रात्री तुमच्या मित्रांना गोळा करून घरी बसतही नाही !"

"मग काय तुला आनंदच व्हायला हवा !"

"तर काय, खरंच मला आनंद व्हायला हवा ! दुसरंही एक लक्षात आलंय् माझ्या !"

"ते आणि काय ?"

"आता दाराची बेल वाजली की तत्परतेनं दार उघडायला तुम्ही पुढं धावता !"

"मग काय कोण आलं असेल त्याला दाराशीच उभं करून ठेवू !"

"ते का, बायकोला 'पहा' म्हणून हुकूम फर्मावता येतो की !"

मी काही बोललो नाही. अंधार होता. तेव्हा माझा चेहरा बायकोला दिसणं अवघड होतं.

"आताशा तुमचं माझ्यावरचं प्रेमच कमी होत चाललंय् !"

"ए उगीच काही तरी म्हणू नकोस हं !"

"पटवून देईन. आज नारळ फोडताना माझं बोट सांपडलं. हाक मारली तुम्हांला, आलात ?"

"हाक कधी मारलीस बुवा !"

"तुम्ही ती नवी रेकॉर्ड आहे ना !–"आज अचानक" ती ऐकण्यात मग्न झाला होता तेव्हा !"

खरं सांगायचं म्हणजे हाक ऐकू आली होती; पण रेकॉर्ड ऐकण्याचा असा काही मजा आला होता–! उठावसंच वाटेना !

बायकोचा हात हातात घेत मी म्हणालो, "पाहू कुठचं बोट चिमटलं ते !"

परत माझी बायको खुदकन हसली. इतका काळजीपूर्वक काढलेला माझा चिंतेचा सूर व्यर्थ गेला.

बायको हसतच राहिली. मग स्वतःलाच थांबवत म्हणाली,

"तुम्ही जीची वाट पहाता ना, ती इथं नाही ! बडोद्याला गेलीय !"

"कोण, कोण ?"

"सांगू का मिस्टर परांजपे, तुम्हांला किनई मी चांगली ओळखते. तुमच्या मनात काय चाललं असतं मला चांगलं समजतं. उगीच कशाला कोण. . .कोण करता ?"

त्यावर उत्तर देण्याकरिता उघडलेलं तोंड मी बंद केलं. काही उपयोगच नव्हता ! गप्प बसलो.

"कां, गप्प कां झालात ?"

"माझ्या मनातलं सगळं समजतं ना तुला ?"

"कधी येणार ती परत–हा दुसरा प्रश्न ना ! उद्या येणार आहे ती ! झोपा आता !"

लहान मुलाच्या हातावर खाऊ ठेवतात तसा माझ्या समाधानासाठी बायकोनं माझा एक मुका घेतला, कुशी वदलली आणि ती झोपी गेली.

मी मात्र जागतच राहिलो. झोपच उडाली. तुम्ही सांगा, तुमच्या मनात येणारा प्रत्येक विचार बायको आपला वर्तमानपत्रातल्या बातमीसारखा सरळ वाचू लागली तर तुमची काही धडगत राहील का ? समस्त नवऱ्यांची मोठीच अडचण होईल. अहो, बायको झाली म्हणून काय झालं, माणसाला काही स्वतःचं असं स्वतंत्र जीवन थोडा वेळ का होईना, पाहिजेच की–!







अनुक्रमणिका

खरोखरच काही तरी निमित्त काढून मी आपला गेले चार दिवस जास्तीत जास्त वेळ घरीच काढत होतो. नव्या जागेत माझी छोटीशी डार्करूम करायची होती. त्याचं काम नाही तरी चालूच होतं. हे काम करत असतानाच रोजच कान दरवाजाकडे असत. बेल वाजली की मी दार तत्परतेनं उघडत असे. दारात बहुधा कामाची बाई किंवा कचरा न्यायला आलेला मुलगा उभा असे.

हे सगळं बायकोनं पाहून ठवलं होतं—आणि ते सांगायला तिनं वेळ शोधली ही रात्रीची ! ह्याच गोष्टी रात्री बोलायच्या असल्या तर दोन खोल्यांची गिरगावातली जागा सोडून ह्या स्वतंत्र ब्लॉकमध्ये कशाला रहायला आलो आम्ही ?

सुरेखा चार दिवसात दिसली नाही म्हणून मी खरोखरच बेचैन होतो. बाहेरून घरी परतताना एक वेडी आशा मनात असे. सुरेखा घरी आली असेल आणि अचानक मी आलेला पाहून तिची मोठी त्रेधा उडेल. टप्पोरे डोळे इकडे तिकडे फिरवत, कुठंतरीच पहात ती विचारेल—खरंच काय विचारेल— ?

"मिसेस परांजपे आहेत काय ?" छेः काय रुक्ष प्रश्न हा !

मी फिरून बायकोजवळ सरकलो. हळूच तिच्या खांद्यावर हात ठेवला, जणु मी सुरेखाच्याच खांद्यावर हात ठेवत होतो; पण बायको ठाम झोपलेली. उशीवर, लोडावर हात ठेवावा किंवा झोपलेल्या बायकोच्या खांद्यावर ! दोन्ही सारखेच !

वाईट नाही—उद्या सुरेखा येते आहे. उद्या पहिल्यांदा ती मलाच भेटायला हवी. भेटेल का ? ह्या विचारात कधी झोप लागली हे समजलं नाही.

पहाटे मी दचकून जागा झालो. बेल वाजत होती. कोपराचा धक्का देत बायकोला मी म्हणालो;

"ए दूध घे ग !

बायको जाम हालली नाही. जागी देखील झाली नाही. परत बल वाजली तसा मीच नाइलाजाने उठलो. अंधारात धडपडत, टेबलावरचं दुधाचं भांडं उचलून मी झोपाळलेल्या डोळ्यांनी दार उघडलं आणि दुधाचं भांडं पुढं केलं !

दारात सुरेखा उभी होती ! आता लाजायची पाळी माझी होती. भांबावून गेलो मी ! हात वर करून दोरीवर वाळणारा बुशशर्ट मी खाली खेचला आणि अंगात चढवला. पण माझ्यापेक्षा अधिक भांबावली होती सुरेखा ! मला पाहून तिला कमालीचं आश्चर्य वाटलं होतं. जणू मिसेस परांजपेंच्या ब्लॉकमध्ये हा कोणी अगांतूक ह्या भलत्या वेळी अचानक आला आहे.

मी पुढं केलेलं भांडं अद्याप तिच्या हातात होतं. ते मी पटकन् परत घेतलं आणि तिच्या बोटांचा स्पर्श माझ्या बोटांना झाला. अंग मोहरून आलं. मी म्हणालो,

"माफ करा !"

"तुम्हीच माफ करा !"

"कशाबद्दल ?"

"अं ऽ मी तुमची झोपमोड केली म्हणून !

ह्या बाईंनी झोपच उडवली आहे माझी, आणि आता झोप-मोड झाल्याबद्दल माफी मागत आहे.





अनुक्रमणिका

"कधी आलात तुम्ही ?"

"ही आताच !" इतका वेळ मला न दिसलेली सुटकेस तिनं दाखवली.

'मिसेस् परांजपे आहेत घरी ?'–अहाहा–फिरून तोच प्रश्न ! मिस्टर परांजपे समोर उभे आहेत त्यांना काहीच किमत नाही काय ?

"हो आहेत ना ! का ?"

"नाही, माझ्या घराची किल्ली हवी होती !"

"अं इथं आहे ती ? कुठं ठेवलीय् !" मी गोंधळून म्हणालो.

"अहो पण तिला आत तर येऊ द्याल !" आता जाग्या झालेल्या बायकोचा आवाज–! बरोबर सुरेखासमोर तिनं माझा वेंधळेपणा काढला. असा राग आला होता. मुकाटयानं बाजूस सरकलो. हातातली छोटीशी सुटकेस सावरत सुरेखा आत आली आणि बायकोबरोबर बेडरूममध्ये गेली.

"आमची शांता आली होती का ?"

ही कोण बुवा आणि शांता ?

"नाही ग. तू गेलीस त्याच दिवशी आली होती. तिच्याकडून भांडी घासून घेतली. कपडे धुवून घेतले. पण परत काही ती आली नसणार !"

"अय्या मग आता प्यायचं पाणीही घरात भरलेलं नसणार !"

ह्या बायकोनं काही बोलावं–? बायको आपली चादरीच्या घडया घालण्यात मग्न ! स्त्रीदाक्षिण्य हा प्रकार फक्त पुरुषापुरताच ! एरवी कधी एक स्त्री दुसऱ्या स्त्रीला दाक्षिण्य दाखवताना आपण तरी कधी बुवा पाहिलेलं नाही.

"माझ्याकडची एक घागर भरलेली आहे. ती पाठवून देईन !"

छे: छे: हे मात्र फारच झालं. मला मग अगदी रहावेना तसा मी खोलीत गेलो आणि म्हणालो, "त्यापेक्षा त्या आपल्याकडेच येईनात चहाला !"

पाहुण्यासमोर व्रात्य मुलाला मारता येत नाही म्हणून आई जशी मोठे डोळे करून पहाते ना, तसा एक दृष्टीक्षेप, सुरेखाच्या लक्षात न येईल असा, माझ्याकडे टाकला गेला.

इतका वेळ ठीक असलेली सुरेखा मला पाहून फिरून भांबावली, कशीबशी म्हणाली, "नको नको १० वाजेपर्यंत येईल ना पिण्याचं पाणी !"

"मग काय तोवर तशाच चहादेखील न घेता रहाणार ? पहा तर खरं आमची बायको कसा फर्स्ट क्लास चहा करते ते !"

हे आपलं उगीच ! जाता जाता बायकोच्या रागावर थोडसं पाणी शिपडण्यासाठी !

एवढया वेळात बायकोच्या चादरीच्या घडया घालून झाल्या होत्या. सुरेखाला ती म्हणाली,

"येग तू चहाला आमच्याकडे ! आठ वाजेपर्यंत आवरेल ना तुझं ! त्यापेक्षा उशीर केलास तर आमच्या ह्यांची कंपनी नाही मिळायची !"

वा : दिला शालजोडीतला ! स्त्रियांचा स्वभावच तो ! मत्सरी ! परत वर चेहरा असा साळसूद की सुरेखाच्या काही लक्षात आलं नाही. ती बिचारी साधी भोळी, बॅग उचलत म्हणाली, "येते हं आठपूर्वी !" आणि ती निघून गेली.

आता इथं थांबणं म्हणजे धोका– !

"आज अचानक गांठ पडे"–असं गुणगुणत मी बाहेर गॅलरीत सटकणार इतक्यात बायकोनं पकडलंच ! ह्या 'अचानक गांठ पडे'ने दगा दिला.

"कुणाची गाठ पडली हो ?"

"गाठ. हं हं. हे पहा त्या कुमार गंधर्व नाहीतर कवी अनिलना विचार– !"

"त्यांना कशाला, तुम्हाला विचारते ! आणि काय हो कुणाला घरी चहाला बोलवायच्या अगोदर जरा बायकोला विचारायच– घरात काही खायला आहे, नाही ?"

"हात्तिच्या ! काय आणायचं असलं तर सांग ना–रवा, साखर, ब्रेड, मस्का– !"

"हे खाली जाऊन आणाल तुम्ही ?"

"अलबत, राणी सरकारांनी नुसता हुकूम द्यायचा !"

आणि बायको एकदम खुदकन हसली. हसतच राहिली.

"नाही, सकाळच्या वेळी काही आणायला सांगितलं तर वसकन अंगावर येता–वेळ नाही म्हणून !"

परत हसत हसत ती म्हणाली, "आज राहू दे. पण परत काही लागलं तर सांगेन, तेव्हा कुरकूर करू नका. आता साबूदाण्याची खिचडी करते. रात्रीचं साईचं दही आहे बरोबर !"

वा: बायको असावी तर अशी !

खिचडी उत्तम झाली होती. पण खरं सांगू का तिकडं लक्ष होतं कुणाचं ! समोरच सुरेखा बसली होती. वास्तविक तिचं सारखं चाललं होतं की ती व माझी बायको नंतर बसतो म्हणून ! पण खिचडी गार झाल्यावर बरी लागत नाही म्हणून आग्रहानं बायकोनं तिला माझ्याबरोबर खायला बसवलं. चहा करायला ती स्वयंपाकघरात गेली, तो तिचा अद्याप पत्ताच नव्हता. मिळाला तेवढा वेळ मी सार्थकी लावला. सुरेखानं नुकतंच केसावरून स्नान केलं होतं.

बॉबकट केलेले तिचे केस खांद्यावर रुळत होते. लक्षात येईल न येईल अशा तिनं भुवया गडद केल्या होत्या. तिच्या पावडरचा गंध माझ्यापर्यंत दरवळत येत होता. तिचे नाजूक गोरेगोरे दंड बिन-बाह्याच्या पोलक्यामुळे नजरेत भरत होते. दंव पडलेल्या गुला-बाच्या फुलासारखी सुरेखा दिसत होती. ताजीतवानी, उत्फुल्ल, प्रसन्न ! तिच्या चेहऱ्यावरून नजर काढावीशी वाटत नव्हती. तिची नजर मात्र भिरभिरत होती आणि चुकून माझी तिची नजर नजरेला मिळाली की ती लाजून चूर होत होती.

एवढ्यात बायको आली. 'हे काय ? बशी अजून संपली नाही ?" आणि तिनं माझी बशी परत भरली. सुरेखा नको नको म्हणत असता दोन चमचे खिचडी तिच्याही बशीत घातली आणि चहा कपात ओतला.

एवढा वेळ आम्ही गप्पच होतो. आता शांत रहाणं बरं दिसलं नसतं म्हणून मी सुरेखाला विचारलं,

"तुम्ही नेहमी ब्रेकफास्टला काय घेता ?"

"ब्रेड ऑम्लेट !"

"वा: वा: तुम्ही खाता का ? नाही तर आमची ही ! सांगा तिला. आता व्हिजीटेरिअन अंडीसुद्धा मिळतात."

"काही तरीच काय तुमचं !"—बायको !

"विश्वास नाही ना. ह्यांना विचार. शुद्ध शाकाहारी अंडी !"

सुरेखानं होकारार्थी मान हालवली. वा: होकार द्यावा तर अशी मान हालवून ! पण तो शाकाहारी अंड्यांच्या बाबतीत काय उपयोगाचा ?

"अहो पण तुम्ही खाना. मी नको थोडीच म्हणते ? अंडीच का कोंबडीही खात जा ! शुद्ध शाकाहारी कोंबडीही मिळते म्हणे आज काल !"

"काहीतरीच काय ? आणि कोंबडी खायची म्हटली तर खाणार कुठं ?"

'का, सुरेखा पाठवत जाईल की !'

"तुम्ही खाता ?"

"मिस्टर बापटांना रोजच नॉन-व्हेज लागतं !" सुरेखा म्हणाली.

मिस्टर बापट ! सुरेखाच्या गळ्यात मंगळसूत्र असूनही आता-पर्यंत मला ते दिसलं नसल्यासारखंच होतं. आता तिनं स्वतःच मिस्टर बापटांचा उल्लेख केला तसा मला खिचडीत खडा लागला. (असा आम्ही कबाब कुठं खाणारे आहोत, हाड्डी लागायला.)

सुरेखाचं लग्न झालं आहे. तिचे मिस्टर. . मिस्टर बापट रोज नॉन व्हेज खातात, आणि ही ब्राह्मण मुलगी पतिदेवांच्या करिता स्वतःच्या हाताने ते रोज बनवते. पण ह्या सुरेखाचं मिस्टर बापटांवर खरोखर प्रेम असेल का ? नसावंच ! ह्या रोज मुरगी अंडी चापणाऱ्या बापटांबद्दल माझा काही बरा ग्रह झाला नाही.

"सध्या कुठं आहेत बापट ?" मी आपलं उगीचच विचारलं.

"दिल्लीला ! जाताना आम्ही ट्रेननं गेलो. रस्त्यात मी बडो-द्याला उतरले. परत येताना ते विमानानं येणार आहेत, नाहीतर आम्ही मिळूनच आलो असतो."

अरसिक लेकाचा ! बायकोबरोबर फर्स्टक्लास कुपेमधून यायचं सोडून तिला एकटीला यायला लावून हा विमानानं उडत येतो आहे.

बायकोबरोबर कुपेतून प्रवास करायचा ही फार दिवस अतृप्त राहिलेली माझी इच्छा ! प्रवास कसा लांबचा हवा. मुंबई ते दिल्ली ! फरांटीयर मेलने किंवा डीलक्सने !

खरोखर मिस्टर तुम्ही एकदा डीलक्सनं दिल्लीचा प्रवास कराच ! डब्यात नुसता बगीचा फुललेला असतो. तंग पंजाबी ड्रेस-मधल्या गोऱ्यापान उंच रमणी. अंगाबरोबर घट्ट स्लॅक अथवा मिनीस्कर्ट घातलेल्या सुंदरी. नुकतीच अठराव्या वर्षात प्रवेश-णारी नवयौवना शेजारच्या सीटवर बसली की एअरकंडीशण्ड डब्यातही गरम व्हायला लागतं. अहो, थोडाथोडका वेळ नाही चांगला चोवीस तासांचा हा प्रवास ! त्यात मध्ये एक रात्र! आजू-बाजूचे सगळे झोपलेले, वर मंद प्रकाशणारा निळा निळा दिवा आणि शेजारी अशी तरुणी—!

आता सुरेखा समोर असताना बायकोबरोबर कुपेनं प्रवास करायची कल्पना मला एकदम अळणी वाटू लागली.

"तुम्ही नाही गेलात दिल्लीला ?"—मी विचारलं.

"मला नाही आवडत. मिस्टर बापट सकाळी बाहेर गेले की एकदम रात्री उगवतात. दिवसभर बिझनेस मिटींग् ! दोन वेळा दिल्लीला जाऊन हॉटेल उबेराय इंटर कॉंटीनेंटलखेरीज मी काहीही पाहिलेलं नाही !"

छे: कसला नवरा हा ! बिझनेसबरोबरच लग्न करायचं ह्यानं ! दिल्लीची नोव्हेंबरमधील नुकती सुरु झालेली गुलाबी थंडी. लाल किल्ल्यातला केवळ प्रकाश आणि ध्वनीनं इति-हास साकार करणारा सॉं-ए-लुमियर-. . कॅनॉट सर्कलमधल्या दुकानांच्या शोकेसेसमध्ये लावलेल्या स्त्रियांना वेडं बनवणाऱ्या एकेक सुरेख वस्तू. . कुतुबमिनारच्या पहिल्या मजल्यावरून दूरवर पसरलेली दिसणारी दिल्ली. . ह्यापैकी काहीच पाहायला मिळालं नाही हिला ! मला सुरेखाची कमालीची कणव आली.

नक्राश्रू !



पहा हो, ही इंदिराजी ' फॅसिस्ट आहे, कम्युनिस्ट आहे, माओवादी आहे, सोकोणोंवादी आहे . आहे . . आहे !

# [ ३ ]

घरी परतायला उशीर झाला होता. झपझप पावले उचलीत मी घरी चाललो होतो. दिवसभरच्या कामाने पुरा दम निघाला होता.

सोसायटीच्या कम्पाऊंडमध्ये मी आलो आणि मागून आलेल्या हॉर्नच्या कर्कश आवाजाने दचकलोच ! मला ओलांडून एक काळी फियाट वेगाने जाऊन आमच्या बिल्डींगसमोर थांबली. इतक्या वेगाने गाडी नेणाऱ्या माणसाचा मला कमालीचा राग आला. आमच्या लग्नाला सहा वर्षे होऊनही अद्याप मला मूल नाही हे सोडा, पण सोसायटीच्या आवारात इतरांची मुले खेळत असतात, कुणी मोटारच्या समोर धावत आले तर–!

मोटारीतून एक सूट घातलेले गृहस्थ उतरले. वय अंदाजे पस्तीस; पण एवढ्यातच पोट सुटू लागलेलं दिसत होतं. वर्ण गोरा, चेहऱ्यावर श्रीमंतीचे सुख! गाडीजवळ उभा राहून ह्या गृहस्थांनी त्यांच्या गाडीचा तो कर्कश हॉर्न वाजवला. एकदा–दोनदा आणि मग सततच !

मला इतका राग आला. गाडी झाली, पैसा असला, उन्हाळ्यात सूट घालून मिरवलं, तरी साधी सभ्यता नाही ह्याला. वर जावं आणि सांगावं काय सांगायचं ते आपल्या बायकोला. हा काय शिष्टपणा !

इतक्यात लगबगीनं गॅलरीत आलेली सुरेखा मला दिसली.

" Come down dear ! And please bring my blue file. .'"

हे मिस्टर बापट तर– !

बायकोशीदेखील ह्यांना इंग्लीश भाषेतून बोलावे लागते.

मिस्टर बापटांनी सिगरेट केस काढली; त्यातली एक सिगरेट, केसवर हलकेच दोन तीन वेळ आपटली आणि सोनेरी लायटरने ती पेटवली.

एक झुरका सोडून बापटांनी वर एक दृष्टीक्षेप केला आणि फिरून हॉर्न वाजवला.

सुरेखा लगबगीनं मोटारजवळ आली. घाईनं आल्यानं तिला किंचित श्वास लागला होता. फाईल घेऊन मिस्टर बापट मोटारीत बसले. त्यांनी सुरेखाला काय सांगितलं हे काही मला ऐकू आलं नाही पण सुरेखाच्या चेहऱ्यावर पसरलेली नाराजी माझ्या नजरेतून सुटली नाही.

मिस्टर बापटांनी सुरेखाच्या हातावर हात ठेवला. ओठात सिगरेट तशीच ठेवून ते काही म्हणाले आणि सुरेखाच्या हाताला त्यांनी किंचित थोपटलं.

माझ्या छातीत जळजळलं ! ही जळजळ, सिलोन रेडिओनं दर दहा मिनिटांनी कितीही खात्री दिली तरी, औषधी गोळ्या काही थांबवू शकत नाही.

गाडी सुरू झाली आणि आली त्याच वेगानं निघून गेली.

मी पुढे झालो आणि सुरेखाला 'हॅलो' म्हणालो.

मला अनपेक्षितपणे उमटलेला पाहून सुरेखा दचकलीच. मग कमालीची गोंधळली. लाजली.

"चला, वर जाऊ !" ती कशीबशी म्हणाली.

आम्ही जिना चढू लागलो. सुरेखा इतकी जवळ होती की मला आमच्या जिन्याच्या पायऱ्या स्वर्ग-सोपानाच्या पायऱ्यांसारख्या वाटल्या.

आमच्या मजल्यावर पोहोचल्यावर सुरेखा म्हणाली, "आता ऑफिसातून आलात ना. आज चहा घेता आमच्याकडे, मी मिसेस परांजपेंना बोलावते !"

"परत कधी तरी !" मी म्हणालो.

सुरेखानं आग्रह केला नाही. ती तिच्या ब्लॉककडे जायला वळली तसं न रहावून मी एकदम म्हणालो–"सुरेखा– !"

ती थबकली ! माझ्याकडे तिनं वळून पाहिलं. नजरेत राग नव्हता. जणू ही अशी हाक तिला अपेक्षितच होती. मग वळून माझ्यासमोर येत तिनं हलकेच विचारलं–

"काय ?"

"एक विचारायचं होतं"

"विचारा ना !"

"मिस्टर बापट अत्ताच येऊन गेले ना–!"

"ते सांगायला आले होते घरी जेवायला येणार नाही म्हणून. वास्तविक फोनच केला असता त्यांनी; पण बायकोसाठी नाही तरी फाईलसाठी यावं लागलं त्यांना ! त्यांच्याकरिता खास जेवणाचा बेत केला होता मी आज ! पण जाऊ दे ! नेहमीचंच आहे हे !"

"सुरेखा, बापट असे वागतात, तरीही तुम्हांला आवडतात ते ?"

"प्रश्न अनपेक्षित होता. ती गोंधळली, पण क्षणमात्रच !

मग हसून म्हणाली, "म्हणजे काय ? अहो लव्हमॅरेज आहे आमचं !"

आणि बोलता बोलता एकदम "अच्छा" म्हणून सुरेखा निघून गेली. रिकाम्या जिन्यात मी एकटाच उरलो. वाटलं, सुरेखाच्या मागून तिच्या घरात जावं. तिला सांगावं–हे कसलं लव्ह-मॅरेज ? स्वतःची फसवणूक करून घेते आहेस तू ? त्या बापटासारख्या अहंमन्य, शिष्ट, आत्मकेंद्री माणसाचं कुणावरही प्रेम नसतं.

पण हातून काही घडलं नाही. मुकाट आमच्या ब्लॉककडे वळलो.

ऑफिसचे कपडे उतरवून मी नाईट ड्रेस चढवला. फिक्या निळ्या नाईट ड्रेसकडे पहाताना फिरून मला सुरेखाची आठवण आली. पूर्वी लेंगा आणि बनियन हा माझा घरातला नेहमीचा वेष ! आता सुरेखाचं येणं घरी केव्हाही घडत असल्यानं, ब्लॉकचे पैसे फिटेपर्यंत काटकसरीची कडक मोहीम सुरू असताही मी हा नाईट ड्रेस आणला.








माझ्या अंगावर परवा, हॅंडलूमचे चट्टयापट्टयाचे बुशशर्ट पाहिलेत ना, तेही असेच आले. एरवी नेहमी सफेद कपडे मी वापरतो. पण सुरेखानं सांगितलं की हॅण्ड-लूम हाऊसमध्ये सध्या सेल चालू आहे. ते बुशशर्ट सुरेख दिसतील तुम्हाला. घेऊन आलो. बायको म्हणते–कसला विदुषकाचा वेष आणलात. आता तिला हे सांगू की सुरेखाची आवड आहे ही !

सुरेखानं निव्वळ माझ्या कपडयातच रंग आणला असं नाही तर जीवनातही बदल घडवला. पूर्वी अधूनमधून दिस-णाऱ्या पांढऱ्या केसांची पर्वा वाटत नसे मला. आता मी केस काळे करणाऱ्या हेअर ऑईलची बाटली वापरू लागलो आहे.

गेल्या चार आठ दिवसात सुरेखाच्या माझ्या भेटी–अर्थात ओझरत्याच–हळू हळू वाढताहेत. परवा ती आली आणि माझ्या सौभाग्यवती स्नान करत होत्या. मग मलाच स्वयंपाकघरातील कोथिंबीर शोधून द्यावी लागली.

हे असेच साधे प्रसंग, पण हळूहळू मैत्रीचा अस्पष्टसा धागा सुरेखाच्यात व माझ्यात गुंफला जात होता. निदान मला तसं वाटत होतं. हे 'वाटणं' कदाचित माझ्यापुरतंच मर्यादित असेल. तरीही मी कमालीचा खूष होतो. दिवसा अचानक कोठेही माझ्या तोंडून गाण्याची ओळ येई,

"आज अचानक गाठ पडे !"

आताही मी तेच गाणं गुणगुणत होतो इतक्यात 'जेवायला वाढलंय् !' म्हणून आतून आवाज आला. आज तो विशेष मंजूळ होता, त्यावरून मी ओळखलं की बायको आज मूडात आहे.

दोन ताटात वाढता वाढता बायको एकदम म्हणाली–

"एक विचारू– ?"

उगीचच घाम फुटला. असं घाबरायला फार होतं अलिकडे. पण उसनं अवसान आणत मी म्हणालो–'विचार.'

"आपण एका ताटात बसूया आज ?"

सुटलो ! मग हसत हसत मी म्हणालो,

"वा: वा: नवऱ्यावर आज एवढी कशी मेहेरनजर वळली ?"

"नेहमीच असते ती. पण तुमचं लक्ष असेल तर ना !"

"म्हणजे कुठं असतं माझं लक्ष–?" हा ओठावर आलेला प्रश्न घासाबरोबर तसाच गिळला. असं काही विचारणं धोक्याचं होतं !

आम्ही एकाच ताटात जेवायला बसलो होतो, पण बायको गप्प गप्पच होती. एक पोळी संपली आणि रुष्ट आवाजात ती म्हणाली–

"खरंच आताशा तुमचं माझ्याकडे बिलकुल, लक्ष राहिलेलं नाही."

"का का आता काय झालं बुवा आणखी ?"

"ही एवढी तुमची आवडती टोमॅटोची आमटी केली. म्हणालात का आवडली म्हणून ? आठवतं, पूर्वी एकदा मी अशीच आमटी केली होती !"

"आठवतं म्हणजे काय ? चांगलं आठवतं ?"

"केव्हा सांगा बरं ?"

"आता तारीख नाही लक्षात, पण चव चांगली लक्षात राहिली आहे– !"

"तारीख नाही ना आठवत ! आपल्या लग्नाचा वाढदिवस होता तो–! तुमच्या आग्रहामुळे आपण असेच एका ताटात जेवायला बसलो होतो–!"

ही बायकांची 'मेमरी' ! तो एल्. आय्. सी.चा कॉम्प्यूटर झक मारतो ह्यांच्या मेमरीपुढं !

बायकोनं भात कालवला आणि एक घास मला दिला. तुम्हाला खरं सांगू का ?– पाहिजे त्या गोष्टीत माणसानं काटकसर करावी, अगदी अर्धपोटी रहावं लागलं तर रहावं; पण असा स्वतंत्र ब्लॉक मिळवावा. काय सुख असतं ह्या स्वतंत्र जागेत रहा-ण्याचं ते चाळीत दिवस काढलेल्यांनाच समजेल.

आमचंच उदाहरण घ्या ! हा महा-गाईचा ब्लॉक घेताना काय थोडी का अडचण सहन करावी लागली आम्हाला ! कोठून कोठून कर्जाऊ रक्कम उभी करावी लागली. आणि ती फिटेपर्यंत केवढी ओढा-ताण चालली आहे आमची ! पण त्या सर्वाचं काही वाटत नाही जेव्हा बायको निर्धास्तपणे, शेजारी पहातील ही भीती न बाळगता, नवऱ्याला असा प्रेमाचा घास भरवू शकते.

मीही बायकोला घास भरवणार होतो इतक्यात बेल वाजली.

आम्ही दोघंही गडबडलो. ह्यावेळी कोण कडमडला.

"कोणी का असेना. बाहेर बसायला सांग थोडा वेळ !"–मी बायकोला म्हणालो.

"नको, तुम्हीच दार उघडा !"

रागानंच मी दार उघडलं आणि ओरडणारच होतो मी ह्यावेळी उमटलेल्या पाहुण्यावर–!

माझे शब्द घशातच अडकले.

समोर सुरेखा हातात एक स्टेनलेसचं भांडं घेऊन अवघडून उभी होती.

"मिसेस परांजपे आहेत ना ?"

काय ह्या प्रश्न ! "हो_आहेत !"

"बाजूला सरका ना ! हात भाजला माझा !"

आणि सुरेखा एक फळी उघडलेल्या दारातून जवळजवळ मला घासूनच आत आली. तिचा तो ओझरता स्पर्श–माझं भान हरपून गेलं. सगळ्या अंगातून एकदम गरम रक्ताचा प्रवाह सुरू झाला.

बायकोचं माझं 'लव्ह-मॅरेज' नाही; पण तरुण प्रेमिकांना लाजवेल अशा बेमालूम-पणे बायकोनं इतक्या थोडक्या वेळात दोन ताटांचं सोंग आणलेलं पाहून माझा तिच्या-बद्दलचा आदर वाढला.

"आज मटण दोप्याजा बनवलं होतं, तुम्हांला आवडतं का पहावं म्हणून घेऊन आले !" सुरेखा म्हणाली.

स्टेनलेसच्या भांड्यावरचं झाकण तिनं काढताच मटणाचा स्वाद दरवळला.

"वा : बसा ना !" मी म्हणालो.

"नाही, मी निघाले आहे परत."

"आता काही मिस्टर बापट घरी नाहीत. मग घाई का ? बसा ना !" आणि मग आपण फारच बोलल्याची जाणीव मला झाली; आणि ते बायकोच्या कितपत लक्षात आलं हे पहाण्याकरिता एक चोरटा कटाक्ष मी बायकोकडे टाकला.

ती निर्विकार होती. माझ्या जवळच्या खुर्चीवरून उठून टेबलाच्या दुसऱ्या बाजूस बसत ती सुरेखाला म्हणाली,

"तूच बैस तिथं. मी काही ते खात नाही !"

"ओ, आय ॲम सॉरी !"–सुरेखा.

"अग तसं चालतं मला इतरांनी खाल्लेलं ! पण चमचा फक्त वेगळा ठेव. आणि तूच वाढ त्यांना !"

सुरेखानं ते एक प्याजा का दो प्याजा मला वाढलं. वाढण्यात छुपा आग्रह होता. न कळेल असं अगत्य होतं. मी त्यावरच खूष झालो.

"आता वाढलं आहे तर जेवण होईपर्यंत थांबा !"–मी.

सुरेखा मघाच्या बायकोच्या खुर्चीवर बसली, ("बायकोची जागा सुरेखानं घेतली" असं लिहिणार होतो, पण तुमचा उगीच गैरसमज व्हायचा !)

"वाः सुरेख, छानच झालंय् मटण !" त्यातली नळी चोखता चोखता मी म्हणालो आणि एकदम आठवलं मघाशी बायकोची टोमॅटोची आमटी आवडली असं काही मी तिला सांगितलं नव्हतं. माझा मीच एकदम गप्प झालो. खाली मान घालून जेवत राहिलो.

माझ्या ताटातल्या भाताकडे पाहून सुरेखानं विचारलं, "तुम्हाला भात खूप आवडतो असं दिसतं !"

. हा भात आम्हा दोघांचा ! बायकोनं वेगळं पान वाढून घेताना तो काही कमी केला नाही.

"हं, हो आवडतो खरा !"

"मिस्टर बापटानाही आवडतो–!" आमच्या दोघांच्या आवडी सारख्याच दिसतात ! पण भाग्य ?

"पण मी फक्त आठवड्यातून एकदाच करते. फार पोट सुटतं भातानं !"

फुगलेल्या फुग्याला सुरेखानं टाचणी लावली.

समोरच्या बाजूनं एव्हांना नजरेची इंटरकाँटिनेंटल बॅलास्टिक मिसायल्स् सुरू होण्याची चिन्हं दिसू लागली होती. मी खाली मान घालून जेवायला सुरुवात केली आणि एकदम चारशे चाळीस व्होल्टचा धक्का मला बसला. विजेचा नाही. सुरेखाच्या पायाचा ! टेबलाखाली तिचा पाय अगदी अलगद माझ्या पायावर पडला. काही क्षण थबकल्यासारखा झाला आणि हळूच बाजूस झाला. काय वाटलं हे कसं सांगू–! बायको समोर बसलेली. घाम फुटला; पण त्या स्पर्शानं वेडं केलं मला !

सुरेखाचा चेहरा निर्विकार होता. कदाचित तिचा पाय चुकून माझ्या पायाला लागला असावा. त्या विचाराने मला हायसे वाटले. सुखही झाले आणि दुःखही ! मी विचार करू लागलो. पाय चुकून लागला असता तर ती चमकली असती. 'सॉरी' म्हणाली असती. म्हणजे–!

सध्याकाळी भेट झाली ती साडी आता सुरेखानं बदललेली होती. केस सैलसे विचरलेले होते. त्यांना लावलेल्या तेलाचा मादक गंध तिच्या पावडरच्या वासात मिसळलेला होता. पापणीच्या कडांवर काळी पेन्सिल फिरवलेली होती. माझ्यापासून काही इंचांच्या अंतरावर ती बसलेली आहे. जरा हात पुढे केला तर तिची नाजूक, लांबसडक, गोरीपान, नखे रंगवलेली गुलाबी बोटे माझ्या हातात येतील.

एक आव्हान, काहीशी अज्ञाताची ओढ, परिणामाबद्दलचा बेफिकीरपणा, सर्वस्व झुगारून द्यावेसे वाटणारी जुगारी वृत्ती आणि ह्या साऱ्यामागे कुठंतरी लपलेली थरथरती भीतीची जाणीव–! मी हळूहळू पाय पुढं केला. कणाकणाने . . आणि माझ्या पायाला तिच्या नाजूक पावलांचा स्पर्श झाला. 'सॉरी' म्हणायची तयारी होतीच. पण तिचा पाय मागे गेला नाही. एक विद्युतप्रवाह सर्वांगाला बधीर

## डोह

अेकदा अेक चंद्र
राजहंसी पंखांचा
रात्रीच्या मनात उमललेला
अेक राजीव आभास—

अेकदा अेक इंद्रधनुष्य
वर्षेच्या श्यामल स्तनावरून
वासनेप्रमाणे ओघळणारा
अेक रंगविलास—

ढगांचे भस्म फासून
तपाचरणास बसलेले
विराट मौनात हरवलेले
असे अेक आभाळ—

अेकदा अेक वणवा
किनाऱ्याजवळ पेटलेला
पृथ्वीच्या अशांत काळजातून
उधाणलेला जाळ—

अेकदा अेक कबूतर
अेकदा अेक कोकिळा
अेकदा अेका हरिणाची
बिलगलेली तहान—

असे काही काही
साठवले होते जळात
आता ग्रीष्म मागतो आहे
त्या सगळ्याचे दान.

—कुसुमाग्रज

करू लागला. आणि अकस्मात सुरेखा उठली.

"मी जाते. जेवण झालंय यांचं !"

सुरेखा निघून गेली.

बायकोनं भांडी आवरली. मी तसाच बसून होतो. बायको पलिकडे स्वयंपाक-घरात कट्टा पुसत असावी.

पापही किती मोहक रूप घेऊन येतं ! किती सहजतेनं माणसाला वेडं करतं ! कळत असूनही वळत नाही ती ही स्थिती. किती सहज वहावत गेलो मी ! माझी पत्नी समोर असताना हे घडावं माझ्या हातून ! मग मी विवाहवेदीवर शपथा घेतल्या त्याचं काय झालं ? सहा वर्षं आम्ही दोघं एकमेकांवर करत असलेलं प्रेम ह्यावेळी गेलं कुठं ? आणि ते खरोखर प्रेमच असेल तर त्याचा एवढा विसर कसा पडला मला ? इतका थिल्लर, क्षुद्र अन् पापी–हो पापीच असावा मी ! हे पापच आहे. स्वतःच्या पत्नीची प्रतारणा आहे ही !

आता ह्या क्षणीच त्याचं प्रायश्चित घेऊन टाकतो. मी बायकोला हाक मारली. उत्तर नाही. फिरून हाक मारली.

"काय ?" रुक्ष सुरात आतून विचारणा झाली.

"जरा इकडे ये !"

"कशाला ?"

"आत्ताच्या आत्ता, जशी असशील तशी ये !"

"मला यायला वेळ नाही. कट्टा पुसते आहे मी !"

कट्टा कसला पुसते आहेस, संसारावरून बोळा फिरायची वेळ आली आहे.

"आलीस का ?"

कट्टा पुसण्याचं मळकं फडकं हातात घेऊन बायको तशीच समोर आली.

"काय ?"

ह्या "काय" च्या आवेशाने मी गांगरलो. शब्द शोधत होतो एवढ्यात बायको म्हणाली,

"तुमचं ताट उचलून तुम्हीच आत नेऊन ठेवा. मला टेबल पुसायचं आहे."

टेबल, ताट, कट्टा ह्या गोष्टी का माझ्या पश्चातापदग्ध अंतःकरणापेक्षा महत्त्वाच्या ?

"आणि हे पहा, आज तरी दात घासा झोपण्यापूर्वी ! वास येतो मटणाचा मला इथून !"

"अग पण– !"

"शी, तुमच्या ताटांत परत कधी जेवायची नाही मी !"

बायकोनं टेबलावरोबर माझ्या पश्चातापावरही बोळा फिरवला. माझं स्वतःचं ताट आत नेता नेता, अंर्यातच स्वतःशी मी म्हणालो,

"देवा केल्या गुन्ह्याबद्दल कोणतीही शिक्षा द्यायची होतीस मला; पण हा पश्चातापाचा मार्गच बंद करून टाकायची शिक्षा मात्र फारच मोठी झाली.

**[ ४ ]**

भिंतीच्या आधाराने मी पाय स्थिर ठेवण्याचा प्रयत्न करत होतो; त्यावेळी बायको हातात चहाचे दोन कप घेऊन खोलीत आली. मला त्या 'उर्ध्वमूल' अवस्थेत पाहून एकदम थबकून उभी राहिली.

"हे काय ?"

"योगासन – शीर्षासन म्हणतात ह्याला !" माझे पाय भिंतीपासून सुटले आणि जमिनीवर मी आपटायचाच तो थोडक्यात वचावलो.

बायकोला एकदम हसू फुटलं. आता कुणी पडलं की आम्हीही लहानपणी हसत असूं. पण आता असं हसण्याचं हे काय वय बायकोचं ?

चहाचा कप माझ्या हातात देत ती म्हणाली, "ही काय बुद्धी झाली आज ?"

"आजपासून योगासनं करायची ठरवलीत मी !"

"अस्सं, एकदम हे काय डोक्यात आलंय् !"

"चित्तशुद्धी, आत्मोन्नती, मनःशांती, ह्या आध्यात्मिक आणि केस पांढरे व्हायचे बंद व्हावेत, भूक लागावी, पोट उतरावं ह्या आधिभौतिक फायद्यासाठी !"

बायको परत हसत सुटली. मग स्वतःला आवरत ती म्हणाली, "मग माझं उत्पन्न बुडणार तर !"

प्रत्येक पांढऱ्या उपटलेल्या केसाचा चार्ज पाच पैसे बायको माझ्याकडून वसूल करून घेत असे.

कोणत्याही चांगल्या उपक्रमाची प्रथम लोक अशीच टर उडवतात. तेव्हा बायकोकडे लक्ष न देता मी प्राणायामासाठी पद्मासन घालायच्या विचारात होतो, इतक्यात बेल वाजली.

झटपट मी अर्ध्या चड्डीवर पायजमा चढवला.

"जा ना दरवाजा उघडा. बापट बाई असणार !" बायको म्हणाली.

"तूच उघड, मला पर्वा नाही त्यांची !" मी गच्चीत जाऊन उभा राहिलो.

सुरेखाच होती ती. मी आवाजावरून ओळखलं. बायकोला दारातूनच काही विचारून ती उभ्या उभ्या निघून गेली. मी खोलीत नाही हे तिच्या लक्षात आलं असेल का ? नेहमी मीच तत्परतेने दरवाजा उघडत असे, आज घरात असूनही मी पुढे आलो नाही ह्याचं तिला चुकल्या चुकल्यासारखं वाटलं असेल का ?

तिला काहीही वाटो, मला त्याच्याशी कर्तव्य नाही. कुठंतरी मर्यादा ही घातलीच पाहिजे. आणि एकदा ठरवलं की काय शक्य नाही पुरुषाला ?–एवढा तरी संयम हवाच स्वतःच्या मनावर !

ती परत गेली तरी मी आत आलो नाही. बायको गच्चीत आली आणि म्हणाली,












"कोण दिसतंय पलिकडच्या बिल्डींग-मधलं?"

"म्हणजे?"

"एवढं गच्चीत रमलाय म्हणून विचारलं: ही वेळ आहे त्या देशपांडेच्या लिनाची गच्चीत वेणी घालत उभी रहाण्याची!"

कपाळ माझं! 'मेली पुरुषाची जात' त्या दुसऱ्या एका कोणा ललिताबाई बापटांनी बदनाम करून टाकलीय. आता बायकोची काय समजूत घालायची? मी गच्चीतून आत आलो आणि पेपरमध्ये डोकं खुपसून वाचू लागलो. एकदम मानेवर हुळहूळल्यासारखं झालं; बायकोचे ओठ होते ते!

"अग हे काय?"

प्रश्नाचं उत्तर म्हणून दोन्ही हात मानेभोवती पडले आणि कानाचा हालकेच चावा घेतला गेला.

"पडदे उघडे आहेत म्हणून मला नेहमी सांगतेस, आता–!"

वाक्य अर्धवटच राहिलं. कशानं–? आता काय प्रत्येक गोष्ट सांगायलाच हवी. मराठी वाचकांना सूचकता का काय ती एवढीही समजत नाही. प्रत्येक चित्रपटाचा शेवट लग्नाच्या सीनमध्येच हवा असतो त्यांना! नशीब तेवढ्यावर तरी थांबतात. नाही तर–!

जाऊ द्या! काय सांगत होतो, हं, व्यायाम, योगासन, ते वृत्तपत्र वाचन सगळंच राहिलं. नेहमीप्रमाणं ह्या गोड भुलावणीला फसलो आणि संध्याकाळी सातच्या आत घरी परतायचं, बायकोला चौपाटीवर फिरायला न्यायचं आणि भेळ खायला घेऊन द्यायचं कबूल करून बसलो. त्या बापटबाई (लेखिका) काहीही म्हणोत, पुरुषाची जात भोळीच!

ऑफिसात दिवस मोठा गडबडीत गेला. इराणचे शहा यायचे होते अकरा वाजता. ते दोन तास उशीरा आले. त्यांचे फोटो डेव्हलप करून प्रिंट करून देईपर्यंत संध्याकाळ झाली. फोटो सुंदर आले होते; पण आमच्या संपादक महाशयांनी कधी कुणाला चांगलं म्हटलंय्! शहापेक्षा त्यांच्या पत्नींना जादा प्राधान्य दिलं गेलंय् हा त्यांचा त्यावरचा शेरा! जाऊ दे, म्हटलं, बिचाऱ्यांचं वय पन्नाशी पुढं गेलं आहे. त्यांना काय समजावून सांगायचं!

संध्याकाळी धावत पळत चर्चगेटला ७-०३ ची बोरिवली फास्ट पकडली. ग्रँटरोड ते दादर नॉन स्टॉप! चर्नी रोडला एकदम आठवलं, माव्याचे केक बायकोला फार आवडतात.

ग्रँट रोडला धडपडत गाडीतून उतरू लागलो, लोक विचारतात, "झोपला होतात का झोकली होती?" काय सांगायचं! कसाबसा उतरलो. एक डझन मावा केक घेतले. धावत पळत ७-२० ची अंधेरी फास्ट पकडली. बाहेरच्या हँडलला लोंबकळत दादरला सुखरूप पोहोचलो. सरदारजींची टॅक्सी पकडली, त्यानं ७-३६ ला घराच्या दारात सोडलं. एका टांगेत दोन दोन पायऱ्या करत जिना चढलो. ठराविक खुणेची बेल दाबणार इतक्यात लक्ष गेलं, दाराला कुलूप होतं.

सांगा मिस्टर काय वाटलं असेल मला? एखाद्याचा असा वेडा करण्यात बायका पटाईत! का आलो मी असा धावत पळत? का त्या हँडलला लोंबकळून जीव धोक्यात घातला? कशाला त्या टॅक्सीचा खर्च केला? ह्या सर्वांचं उत्तर हे की मी थोडासा व्यवहारशून्य आहे. शेवटी अहो मूर्खपणा आपल्याकडेच!

ब्रीफ केसमधली किल्ली शोधून दार उघडलं. धडपडत आत जाऊन दिवा लावला: ते केक टेबलवर फेकले आणि फॅनखाली खुर्ची ओढून स्वस्थ बसलो.

पाच एक मिनिटं गेली असतील; बेल वाजली! एकदम राग उतरला. पण चेहरा गंभीर ठेवून दार उघडायला गेलो. एकदम बायकोला जवळ घेऊन चकित करायचं म्हणून मनाशी म्हणत दार उघडलं तर दारात सुरेखा उभी! मला पहाताच ती गोंधळली, लाजली, बावरली.

माझ्या निश्चयाची माझ्याच मनाला आठवण करून देत मी रुक्ष शब्दात म्हणालो,

"मिसेस परांजपे नाहीत घरात!"

"मला माहीत आहे, त्यांचाच निरोप होता..."

"काय?"

"त्यांची गिरगांवातली बहीण आहे ना, तिला मुलगी झालीय्!"

घ्या! ही कुमी आमच्या सौ.ची लहान बहीण! आणखीन् दोन महिन्यांनी तिच्या लग्नाला वर्ष पूर्ण होणार होतं. आणि एवढ्यातच मुलगी झाली हिला!

नाहीतर आमच्या सौ.! सहा वर्ष झाली आमच्या लग्नाला! स्वतःचा ब्लॉक घ्या मगच विचार करू म्हणत इतकी वर्ष व्यर्थ घालवली हिनं! आणि आता ब्लॉक घेतला तर ही बेपत्ता! छळवाद आहे छळवाद! निव्वळ उपासमार!

"सगळं जेवण करून ठेवलंय् म्हणून निरोप दिलाय त्यांनी!"

"बरं!"

"आणि हे पहा मिसेस परांजपेंनी तुम्हांला फोन करायला सांगितला आहे!"

"म्हणजे ती काय रात्री येणार नाही?"

"मला कल्पना नाही; पण तातडतीने फोन करा म्हणून बजावलंय्!"

"आता खाली उतरून त्या इराण्याकडे जायची आपली बिलकुल तयारी नाही.

"मग आमच्या घरून करा!

तिच्याकडे फोन आहे ह्याची मला कल्पना नव्हती. तिचं घर कसं असेल ह्याचा मी कधी विचारच केला नव्हता.

"चलता ना!

"चला! मी म्हणालो.

बाहेरच्या खोलीला प्लॅस्टिकचा गुलाबी रंग दिला होता. त्याच रंगाचे पडदे खिडक्यांना व दारांना लावलेले होते. खोलीतला सोफा सेट.

रेडिओवर बाटलीत प्लॅस्टिकची पिवळी लाल गुलाबी फुलं मोठ्या रसिकतेनं भरली होती. जमिनीवर लाल गालिचा होता. कोपऱ्यात निळ्या रंगाचा टेलिफोन

अनुक्रमणिका

होता. त्याच्या शेजारी निळया कागदांचं पॅड आणि निळं बॉल पॉईंट पेन भिंतीला लटकवून ठेवलं होतं.

इतके दिवस प्रसन्न वाटणारा आमचा ब्लॉक मला आता रेल्वेच्या वेटींग रूम-सारखा वाटू लागला आणि ह्या घराच्या मालकिणीबद्दल माझ्या मनात एक कौतु-काची जबरदस्त लाट आली.

"सुरेख, सुंदरच ठेवलय तुम्ही घर ! अशा घरातून बाहेरच पडावसं वाटणार नाही कुणाला !"

"का, मिस्टर बापट असतात कुठं घरी ? ह्यातलं कशाचंही कौतुक करायला वेळ असतो कुठं त्यांना !"

आणि सुंदर जपानी गेशा असलेल्या शो केसकडे बोट दाखवत ती म्हणाली,

"ह्या शो केसमधल्या वस्तू आहेत ना, तशीच एक बायको–पीस ऑफ डेको-रेशन !"

क्षणभर आम्ही दोघही गप्पच होतो. मग तिनं विचारलं, "नंबर माहीत आहे का ?"

"कुणाचा ?"

"पुरंदरे मॅटरनिटी होमचा !"

तिथपर्यंत पोहोचलोय कुठं आम्ही ! पण तिला काय सांगणार ? मान हालवून 'नाही' म्हणालो.

तिनं डिरेक्टरीतून नंबर काढून दिला. एक छोटासा दिवा टलिफोनजवळ होता. दोरीचा स्विच ओढून तिनं तो पेटवला. टेलिफोनच्या टेबलापुरते प्रकाश वर्तुळ पडले.

मी नंबर फिरवला आणि ऑपरेटर-कडून बायकोला टलिफोनवर बोलावून घेतले.

"हॅलो." पलिकडून सुपरिचित आवाज आला !

"मी बोलतोय !"

"घरी कधी आलात ?"

"हा आत्ताच !"

"आणि मला काय कबूल केलं होतंत, सातला येईन म्हणून !"

ध्या, म्हणजे बाईसाहेबांचा पत्ता नाही घरात, आणि मलाच वर दम !

"पण तू आहेस का घरी ?"

"हे पहा, कुमीला बेबी झालीय्. सातव्या महिन्यात होऊनहीं चांगलं पाच पौंड वजन आहे तिचं आणि काय गोरी गोरीपान आहे. दिसतेही, सगळी म्हणतात, मावशी-सारखी !" मग एकदम तिनं विचारलं, "ऐकताय ना !"

"हो, तर काय ?"

"तुम्ही कधी येता इकडं ? आत्ता याल ?"

"आत्ता ?"

"मग काय झालं ?"

"नाही, तू परत येणार असलीस तर–!"

"मी कशी येणार ? कुणाला कल्पनाच नव्हती ना. आईला कळवळंय्. ती येईपर्यंत तरी कोणी तरी पहायला हवं. खरं ना !"

"होय !"

"उद्या सकाळी याल, नाही... यायचंच ! किती वाजता याल ?"

"दहापर्यंत येतो !"

"नाही, नाही मग ऑफिसला जायची गडबड सुरू होईल. नऊपर्यंत या !"

"हो !" माझा आत्तापर्यंत 'पेशन्स' संपला होता.

"जेवून घ्या. सगळं करून आलेय मी. दूध फळीवर आहे !"

"बरं, बंद करू मी ?"

"हं, हो, पण थांबा थांबा . . . कुठून करताय हा फोन ?"

"कोठून म्हणजे ?" सुरेखाकडे पहात मी विचारलं.

"आपल्या नेहमीच्या इराण्याकडून ? कोणी माणसं फोन करता उभी आहेत का ?"

"आता फोन हिसकावून घेतील ती माझ्या हातून इतकी वैतागली आहेत."

"तरीच असं तुटक बोलणं चाललंय्. बरं मी बंद करते. उद्या सकाळी वाट पहाते."

फोन बंद झाला ! सुरेखा मंद हसत म्हणाली.

"जपायला हवं तुमच्यापासून !"

"कां बुवा ?"

"काय निखालस थापा मारता तुम्ही !"

"म्हणजे तुम्ही आमचं बोलणं ऐकत होता का ? छे छे: असं नवरा बायकोचं बोलणं ऐकू नये !"

मी चेष्टा करत होतो; पण तिचा चेहरा एकदम गोरामोरा झाला.

"नाही म्हणजे, मी मुद्दाम नव्हते ऐकत. आपलं थोडं कानावर पडलं !"

"सुरेखा– !" माझ्या तोंडून फिरून तिच नाव आलं.

"तुम्ही बसा. मी आत्ता चहा करून आणते !"

"नको, आता खरंच नकोय !"

"लगेच आणीन !" दरवाजा अडवून ती उभी होती. अगदी थोड्या अंतरावर ! एकदम मला वाटलं की मी मिठी मारणार तिला ! आपल्या डोळयाच्या पापण्या जशा आपल्या आपण हालत असतात तसं, असं काही घडेल माझ्या हातून.

मी म्हणालो, "परत कधी तरी येईन !"

"नक्की ?"

"नक्की !"

ती बाजूला सरकली. दरवाजा उघडला. खरं सांगायचं म्हणजे तिला सोडून निघायचं माझ्या जीवावर आलं होतं.

एकवार डोळे भरून तिला पाहून घेतलं आणि मी बाहेर आलो. आमच्या ब्लॉक-कडे वळलो.

स्वतःच्याच तंद्रीत मिस्टर बापट वर येत होते. हातात एक ऑफिस बॅग ! तोंडात सिगरेट ! अंगावर सूट !

थोडक्यात वाचलो ! दोन पावलातच दरवाजा गाठला. घरात आलो तो बाय-कोच्या कुशीत आल्यासारखं वाटलं, पुरे आता; भलता धोका नको ! उद्या सकाळी आठ वाजताच ते पुरंदरे मॅटरनिटी होम !

[ उत्तरार्ध पुढील अंकी ]

# चला, हां हां म्हणता रजतमहोत्सवी वर्ष संपले की !

आता सव्विसाव्या वर्षात पदार्पण नि
ते आनंदाने आणि खुसखुशीतपणे
साजरे करण्यासाठी



**वर्षारंभ**
**विनोदप्रधान**
**विशेषांक...**

मार्च १९७० मूल्य २ रुपये

# दीपावली

या अंकाची झलक :

* मराठीने केला कानडी भ्रतार (कथा)
* बाटली, बाई आणि मंडळी (एकांकिका)
* झिला, सीझन नाय--(कथा)
* इडली सांबार (कथा)
* अशी कशी घरात झाली बाई चोरी ? (कथा)
* गड आला आणि सिंहही आला (कथा)
* श्री मारुती महात्म्य (स्तोत्र)
* कविता, चुटके इत्यादि विनोदाने भरलेला भरगच्च मजकूर

आणि

'आज अचानक गांठ पडे' कादंबरिकेचा उत्तरार्ध

तसेच

▼ मासिक बिंगचित्रमाला ▼

अनुक्रमणिका

"हम कुछ कम नहीं है" असेच या उंटाला म्हणावयाचे आहे काय ?



लेफ्टनंट जनरल (निवृत्त)
शंकरराव थोरात
यांनी प्रजासत्ताक दिनानिमित्त
लिहिलेला खास लेख

# नेफा...... पराभव की पिछेहट ?

थोड्या दिवसांपूर्वी एक पत्रकार माझ्याशी बोलताना म्हणाले होते, '१९६२ साली नेफात झालेल्या आपल्या पराभवासंबंधी आपले काय मत आहे ?'

त्यांच्यासारख्या सूज्ञ आणि होतकरू पत्रकाराकडून असा प्रश्न यावा, याचं मला आश्चर्य वाटलं. त्याच वेळी मनात असाही विचार आला की, जर त्यांच्यासारख्या माणसालाही "नेफात आपला पराभव झाला" असे प्रांजलपणे वाटते, तर तीच भावना अनेक सामान्यजनांची तशीच सूज्ञांचीही असू शकेल. ती अंशतः तरी दूर करावी या उद्देशाने मी हातात लेखणी धरली आहे.

सकृत्दर्शनी, नेफात आपला पराभव झाला, असे वाटणे स्वाभाविक आहे. कारण चीनच्या आक्रमणानंतर आपल्या सैन्याची पिछेहाट एक आठवडाभर अतिशय झपाट्याने झाली, हे निःसंशय ! प्रश्न एवढाच आहे की त्या पिछेहाटीला पराभव म्हणावयाचे किंवा नाही ? पराभव कशाला म्हणावयाचा ? जेव्हा एक राष्ट्र, आपल्याला यापुढे लढता येणं शक्य नाही असं मानतं किंवा तहाची मागणी करतं, तेव्हाच त्याचा पराजय झाला असं मी म्हणेन. तात्पुरत्या पिछेहाटीला–मग ती शत्रूच्या बळाच्या ताकदीने झालेली असो, किंवा लढाईच्या डावपेचातील एक भाग म्हणून घडविण्यात आलेली असो, तिला पराजय म्हणणे माझ्या दृष्टीने चुकीचे आहे.

## पहिल्या महायुद्धाचा दाखला

पहिल्या महायुद्धात जर्मनीने जवळजवळ सगळा युरोप पादाक्रांत केला, पण त्यामुळे दोस्त राष्ट्रांचा पराभव झाला, असे नव्हे. कारण अखेर दोस्तांनीच निर्णायक विजय संपादन केला. दुसऱ्या महायुद्धात जर्मनीने पुन्हा एकदा ब्रिटिश सैन्याला डंकर्कच्या बंदरात चेपले, त्यांना पळता भुई थोडी झाली. तरीही इंग्लंडचा पराभव झाला नाही. तसंच जपानी सैन्याने इंग्रज व हिंदी फौजांना ब्रह्मदेशातून चेपीत चेपीत कोहिमापर्यंत आणलं होतं. तरीही शेवटी पराभव जपान्यांचाच झाला होता. ती उदाहरणं देण्याचा उद्देश हे समजावून सांगण्याचा आहे की, जरी सैन्याच्या एक किंवा त्याहून जास्त तुकड्यांचा पराभव झाला तरी त्याला राष्ट्राचा पराभव म्हणणं चुकीचं आहे.

युद्ध (War) म्हणजे एका राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्राशी संघर्ष. युद्धात कित्येक लढाया (Battles) होतात. लढाई म्हणजे एका सैन्याच्या मोठ्या तुकडीचा (ब्रिगेड, डिव्हिजन, कोअर, आर्मी इत्यादि) शत्रूच्या मोठ्या तुकडीशी झालेला सामना. युद्धामध्ये या लढायांची हारजीत सुरू असते. पण एक लढाई हरली म्हणजे राष्ट्राचा पराभवच झाला, असे नाही. प्रत्येक लढाईत दररोज अनेक चकमकी (Actions) होतात. चकमकी म्हणजे लहान तुकड्यांची (प्लॅटून, कंपनी, बटालियन इ.) एकमेकांशी झालेली लढाई. त्यातही हारजीत होत रहातेच.

चीनने नेफावर हल्ला केला, सैन्यबळाच्या जोरावर आणि असेही म्हणता येईल की आमच्या प्रादेशिक कमकुवतीमुळे (Regional Weakness) त्यांनी आम्हाला हुसकावून लावलं. दररोज आमच्या तुकड्या पाठीमागे सरत आहेत, असे घडले. हेही मी कबूल करतो की त्यांची पिछेहाट व्यवस्थितपणे घडली नव्हती. हे सगळं होत असतानाच देशात इतरत्र असलेल्या सैन्याची जुळवाजुळव करून,








त्यांनी नेफातील आपल्या सैन्याच्या कुमकीसाठी पाठविण्याची पारी चाललेली होती. परंतु ते पूर्ण व्हावयाच्या आधीच चीनने ,पला हल्ला थांबविला, आणि कुत्र्याला भाकरीचा तुकडा टाकावा, त्या प्रकारे शस्त्रसंधीची सूचना आमच्या तोंडावर टाकून, आमच्या उत्तराची वाटही न पाहाता, ते परत स्वदेशी गेले. हे आपल्याला कबूल करावे लागेल की, आम्हाला लढाई चालू ठेवण्याची संधी त्यांनी दिलीच नव्हती. ती दिली असती आणि आपले राखीव सैन्य तेथे पोहोचले असते तर आम्ही चिन्यांना हुसकावून लावलं असतं, असा दावा मी करीत नाही. माझा दावा एवढाच आहे, की लढाई चालू ठेवण्याची संधी आपल्या सैन्याला मिळालीच नाही. म्हणून निदान तात्विक दृष्टीने तरी हे कबूल करावयालाच हवे की चीन-हिंदुस्थान संघर्षात हिंदुस्थानचा पराभव असा झालेला नव्हता– नाहीही. पिछहाट जरूर झाली होती. ती कां ?

त्याचे विवेचन करण्याआधी हिंदुस्थानचा नकाशा डोळचा-समोर आणणे आवश्यक आहे. आणि हिंदुस्थानच्या इतर देशांशी असलेल्या सरहद्दींची सुस्पष्ट कल्पना जाणून घेणेही जरूरी आहे, अत्यावश्यक आहे.

### अन्य देशांच्या सरहद्दी

पश्चिमेपासून सुरुवात केली तर पश्चिम पाकिस्तानशी असलेली आमची सरहद्द जवळजवळ xxx मैल आहे. काश्मीर-मध्ये पाकिस्तान व रशियाशी असलेल्या आमच्या सरहद्दींची लांबी आठएकशे मैल आहे. तसेच पूर्व पाकिस्तान व भारत यांची सरहद्द तीन राज्यात विभागली गेली आहे आणि तिचीही लांबी एकूण पाचएकशे मैल तरी भरेल. लडाख, उत्तरप्रदेश, मणिपूर-त्रिपुरा व नेफालगतची चीनशी आपली सरहद्द जवळजवळ एक हजार मैल आहे. त्यानंतर ब्रह्मदेशाशी असलेल्या सरहद्दींची लांबी सुमारे ३०० मैल आहे. पाकिस्तानचे व आपले संबंध दुरावलेले आहेत. १९६२ च्या आधीसुद्धा त्यांच्या आमच्यामध्ये, काश्मीर-मध्ये शस्त्रसंधी झाल्यावरही कटकटी सुरूच होत्या. त्यामुळे पाकि-स्तान हद्दीवर थोडेफार सैन्य ठेवणे भागच होते. तसंच काश्मीरमध्ये असलेले मोठ्या संख्येतील सन्य तेथून हलविणे धोक्याचे होते. आता आपण उत्तर सोडून एकदम पूर्वेला जाऊ. ब्रह्मदेशाशी आपले संबंध चांगले आहेत. तरीपण त्या टापूत असलेल्या नागालँड व काही प्रमा-णात मणिपूरमध्ये आपले सैन्य अडकून पडलेले होते व आहेही. नागालँडमध्ये सुरू असलेल्या बंडाळीमुळे तेथील सैन्य हलविण शक्य नाही.

पूर्व-पाकिस्तान-भारत सरहद्दीवरील आमच्या सैन्याला हलविणे पण अवघड आहे. या पूर्व-विभागात (Eastern Command) असलेल्या सैन्याची संख्या बरीच मोठी आहे. असं म्हणावयाला हरकत नाही की, या टापूत असलेले आणि देशांतर्गत व्यवस्थेसाठी ठेवण्यात आलेल्या सैन्याची संख्या हिंदुस्थानच्या सर्व सेनादलांच्या दोनतृतीयांश तरी असेल. उरलेल्या सैन्यापकी जवळजवळ निम्मे सैन्य प्रशासन आणि पुरवठा यात गुंतलेले होते. म्हणजेच शेवटी

**बरोबर आठ वर्षांपूर्वी नेफामुळे आमची 'न भूतो न भविष्यति' अशी लष्करी मानहानी झाली. अर्थातच राजकीयही....त्यासंबंधी इंग्रजी तसेच इतर भाषांमध्येही पुष्कळच काही लिहिले गेलेले आहे. परंतु निव्वळ लष्करी दृष्ट्या (मिलिटरी सायन्स) तेथे आमचा पराभव झाला की पिछेहाट? जनरल थोरातांच्याच शब्दात हे शास्त्रीय विश्लेषण........**

अंदाजे सत्तर-पंचाहत्तर हजार सैन्य उत्तर-पूर्व सरहद्दीच्या संरक्षणा-साठी मिळालं असतं. संपूर्ण उत्तर-पूर्व सरहद्दींची लांबी जवळजवळ हजार मैल आहे. हिमाचल प्रदेशापासून नेफापर्यंत, नेपाळ भूतानची हद्द सोडली तरी, सहा-सातशे मैलांच्या हद्दीच्या संरक्षणाची जबाब-दारी सैन्यावर आहे. फक्त गणिताच्या दृष्टीने पाहिले तरी आपले ते सैन्य एक मैलास एक हजारापेक्षा जास्त पडत नाही–अर्थात हा फरक आकडेमोडीच्या हिशोबात धरलेला नाही हे स्पष्टच आहे.

### नेफा संरक्षण व्यवस्था

या ठिकाणी हेही स्पष्टच सांगणे आवश्यक आहे की नेफा सर-हद्द संरक्षणाची जबाबदारी १९५९ पर्यंत सरकारने सैन्याकडे दिलेली नव्हती. आसाम रायफल्स या नावाने ओळखल्या जाणाऱ्या मुल्की सैन्याची (Para military force)ती जबाबदारी होती. तसेच तो फोर्स त्यावेळी सशस्त्र दलांमध्ये अंतर्भूत झालेला नव्हता. त्याचे आधिपत्य (Command) भारत सरकारच्या परराष्ट्र विभागाकडे होते. सेना-प्रमुखांचा त्या दलावर कोणताही, कसलाही अधिकार नव्हता. सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे त्याकाळी नेफामध्ये दळणवळणाचे मार्गही नव्हते. नेफा-संरक्षणाची जबाबदारी १९५९ मध्ये सैन्यावर टाकण्यात आली तेव्हा परिस्थिती ही अशी होती. संरक्षणासाठी लागणारे सैन्यही नव्हते. त्याच्या विखुरणीसाठी (Deployment) दळण-वळणाचे मार्गही नव्हते. त्या दोन्ही गोष्टींची पूर्तता होण्यासाठी बरीच वर्षे लागतात. त्यामुळे ती दळणवळणाची प्राथमिक गरज पूर्णपणे भागविल्याखेरीज सैन्य पाठवूनही त्याचा वापर करणे अशक्य होते. ती व्यवस्था होण्यापूर्वीच चिन्यांचा हल्ला झाला.

चीनचा हल्ला कसा व कोठून येईल, याचा अंदाज १९५९ साली पूर्व-विभाग-सेना-प्रमुख (GOC-in-C, Eastern Command) या नात्याने मी त्याकाळच्या सेना प्रमुखांना (Chief of the Army staff) सादर केला होता. तसेच सरकारलाही ते लेखी कळविण्यात आले होते. पण काही कारणांमुळे त्यावर कारवाई झाली नाही, ही दुर्भा-ग्याची गोष्ट आहे (ब्रिगेडियर दळवी यांनी आपल्या Himalayan Blunder या ग्रंथामध्ये असा स्पष्टच उल्लेख केला आहे की जनरल थोरात यांनी जी भवितव्यता वर्तविली होती ती तंतोतंत खरी ठरली...)








लढाईच्या सुरुवातीला आक्रमकाला मिळणारे फायदे व बचाव करणाऱ्या सैन्याच्या अडचणी यांचा विचार आता करू या. लढाई केव्हा, कशी, कोठे करावयाची याची आखणी आक्रमक प्रत्यक्ष संघर्षापेक्षा कित्येक वर्षे निदान कित्येक महिने अगोदर करीत असतो. त्यामुळे लढाईत लागणाऱ्या शस्त्रांची, दारूगोळ्याची व इतर सोयींची व्यवस्था त्याला करता येते. सैन्याची वाढ, जरूर तिथे त्यांची ने-आण, त्यासाठी रसदीची पूर्वतयारी, संदेश वहनाची सोय, इतर शेकडो गोष्टी लढाईला तोंड फुटण्याच्या अगोदर तो करू शकतो. सारांश लढाईला तो पूर्णपणे तयार होऊ शकतो.

**बचावातील महत्त्वाच्या अडचणी**

या उलट बचाव करणाऱ्या सैन्याची अवस्था असते. सदैव लढाईसाठी सर्व प्रकारे सज्ज रहाणे, तितके सैन्य ठेवणे, दारूगोळा शस्त्रास्त्रे यांच्या साठ्यात पैसा गुंतविणे हे आर्थिक दृष्ट्या कोणत्याही राष्ट्राला कधीच शक्य नसते. शत्रूचा हल्ला कसा व कोठून येईल याची कल्पना नसते. त्यामुळे त्याचे सैन्य पूर्वीपासूनच मोक्याच्या ठिकाणी नसते. उगीचच सरहद्दीवर सैन्य पांगवून ठेवणे हेही लष्करी दृष्ट्या चुकीचं असतं. कारण ते तसं पांगविल्यानं ते सगळीकडेच कमकुवत बनतं, व "कोठेही समर्थ नाही" (Strong nowhere) अशी त्याची अवस्था होते. अशा परिस्थितीत लढाईला तोंड लागताच त्याची पिछेहाट होणं अटळ असतं. कारण हल्ला कोठे करावयाचा हे आक्रमक शत्रूने पूर्व विचाराने ठरविलेलं असते. त्यामुळे त्या विशिष्ट मर्यादित टापूत (Limited Area) आपली ताकद एकवटणं शत्रूला शक्य होतं. तर बचावात्मक परिस्थितीतील सैन्याला तशा परिस्थितीत माघार घेणंच भाग असतं. जेव्हा शत्रूला थोपवून धरण्याची जराही शक्यता नसते तेव्हा विनाकारण जवानांची प्राण-हानी करणं निष्फळ ठरतं. त्यावेळी स्वतःच्या सैन्याला बचावून पिछेहाट व संधी आल्याबरोबर तोंड फिरवून लढाई देणं हाच शहाणपणा असतो.

**रंग पालटणं शक्य होतं**

या शुद्ध लष्करी विवेचनावरून (Purely Military Appreciation) कल्पना येईल की, नेफामधील आपली पिछेहाट टाळणं शक्य नव्हतं. आमचं सैन्य मागे हटलं, चेपलं गेलं, प्रथमदर्शनी त्याचा पराभव झाला हे सगळं खरं. पण जर लढाई चालूच राहिली असती, सैन्य, रसद व दळणवळण यांची जुळवाजुळव करणं शक्य झालं असतं तर कदाचित लढाईचा रंग पालटला असता.–तसं झालं असतंच, हा माझा दावा नाही.

पण तसं झालं नाही. आपल्याला लढाई करण्याची (Fighting or waging full-fledged war) संधीच मिळाली नाही. म्हणून माझा दावा आहे की, चिनी–हिंदी संघर्षामध्ये आमचा पराभव झालेला नाही. आम्ही माती जरूरी खाल्ली, पण चितपट मात्र झालेलो नव्हतो व नाहीही.

● ● ●

(टीप: सरहद्दीच्या लांबीचे आकडे स्थूल अंदाजाने दिलेले आहेत.)








## अगदी सोपा उपाय

स्त्रिया खरोखर निसर्गतःच हुषार कशा असतात पहा –

इंग्लंडमध्ये एक मोठा नामांकित डॉक्टर होऊन गेला. त्याची जिकडे तिकडे फार ख्याती पसरली होती. एकदा एक मजूर, आपल्या डोळ्यांत लोखंडाचा लहानसा कण गेला आहे अशी तक्रार करीत डॉक्टरांच्याकडे गेला. डॉक्टरांनी खूप उपाय केले पण इलाज चालेना. शेवटी डॉक्टरने ही गोष्ट आपल्या बायकोस सांगितली.

बायको म्हणाली, "अहो, लोहचुंबक घ्या, म्हणजे कण आपो-आप बाहेर येईल."

या उपायाने तो कण बाहेर आला!

## शिक्षण नि शिकविणे

० भारत-सरकारने एका पाहणीत असा निष्कर्ष काढला की देशांत ६५,००० शिक्षक शास्त्रीय विषय शिकवितात पण त्यांतील १०,००० शिक्षकांनी 'शास्त्र' ह्या विषयाचे शिक्षण घेतलेले नाही!

## औरंगजेब निमूटपणे परतला

पूर्वी 'स्वयंवर' म्हणजे सीधा-साधा मामला होता. परंतु आधु-निक काळांत 'स्वयंवर' पद्धत बदलली–

एक अतिशय सुन्दर मुलगी होती. तिला 'बघायला' एकाच वेळी एकदम दोन तरुण आले. आतां आली पंचाईत. दोघांनाही ती मुलगी पसंत पडल्यामुळे त्या दोघांत लठ्ठालठ्ठी सुरू झाली.

दोघेही हमरीतुमरीवर येत आहेत असे पाहून गावातील वडीलधारी माणसांनी एक योजना शोधून काढली. ह्या योजनेला मुलीने व ह्या दोघा प्रेमिकांनीही मान्यता दिली. ह्या योजनेनुसार दोन चिठ्ठ्या तयार करण्यात आल्या. एकावर 'औरंगजेब' असे एका प्रेमिकाचे नाव लिहिले तर दुसरीवर 'ताज दीन' असे दुसऱ्याचे नांव लिहिले. त्यानंतर ह्या चिठ्ठ्या एका मडक्यात ठेवल्या व घरा-तील छोट्या मुलाला त्यांतील एक चिठ्ठी उचलण्यास सांगितली. 'ताज दीन'ला नवरदेव म्हणून जाहीर करण्यात आले.

औरंगजेब व त्याचबरोबरचा लवाजमा शांतपणे परत गेला!

## दुसरा बूट केव्हा आपटता?

एक गृहस्थ दररोज रात्री खूप उशीरा घरी येत असत. आल्या-बरोबर पायातील बूट काढून एकेक जमिनीवर जोराने फेकीत असत ह्यामुळे खालच्या मजल्यावर रहात असलेल्या गृहस्थांची झोपमोड होई. पंधरा दिवस हा त्रास त्यांनी सहन केला मग त्यांनी वरच्या मजल्यावरील गृहस्थांना बूट हळू काढण्याबद्दल विनंती केली.

दुसऱ्या दिवशी रात्री हे वरच्या मजल्यावरील गृहस्थ नेहमी-प्रमाणे रात्री उशीरा आले. नेहमीप्रमाणे एक बूट त्यांनी काढला व जमिनीवर आपटला आणि एकदम त्यांना खाली राहणाऱ्या गृह-स्थांच्या विनंतीची आठवण झाली त्यामुळे दुसरा बूट त्यांनी हळूच काढून अगदी हळूवार हाताने जमिनीवर ठेवला व ते झोपून गेले.

सुमारे तासाभरानंतर त्यांच्या दरवाजावरील 'बेल' वाजली; म्हणून त्यांनी दार उघडले, पाहतात तो खालच्या मजल्यावरील




गृहस्थ उभे. 'काय झालं?' असे त्यांनी विचारताच हे खालच्या मजल्याचे गृहस्थ अजीजीने म्हणाले, "तेवढा तो दुसऱ्या पायातील बूट काढा ना! म्हणजे मी सुखाने झोपतो!!"

## निम्मी जबाबदारी

● उर्सुला जॅक नांवाची २७ वर्षे वयाच्या पश्चिम जर्मनी येथे राहणाऱ्या गृहिणीला ५ मुले झाल्यानंतर तिने संतती नियमनासाठी एका केमिस्टकडून गोळ्या आणल्या. परंतु त्या गोळ्या घेऊनही तिला आठ पौंडाचा मुलगा झाला. संशोधनांती असे आढळून आले की त्या केमिस्टने चुकून 'पचनशक्ती'च्या गोळ्या त्या बाईला दिल्या होत्या. उर्सुलाने त्या केमिस्टवर फिर्याद दाखल केली. न्यायाधिशाने असा निर्णय दिला–"आपण कोणत्या गोळ्या घेतो, हे बाईंनी बघणे जरूर होते तर आपण कोणत्या गोळ्या विकतो, हे दुकानदाराने बघणे जरूर होते. यास्तव मुलगा अठरा वर्षांचा होईपर्यंत त्याच्या पालनपोषणाचा अर्धा खर्च केमिस्टने सोसावा!"

## धोतरे धुण्याचे काम द्या

पेशवाईतील गोष्ट. पेशव्यांच्या सेवेतून निवृत्त झाल्यावर रामशास्त्री प्रभुणे यांना नाना फडणवीसांनी विचारले–"शास्त्री-बुवा, आपण बजावलेल्या निःस्पृह सेवेबद्दल आपल्या मुलासाठी पेशवे काही करू इच्छीत आहेत. पेशव्यांनी काय करावे?" क्षणाचाही विलंब न लावता रामशास्त्री संयपणे म्हणाले, "नाना, माझ्या मुला-बद्दल पेशव्यांनी आस्था दाखवावी हा श्रीमंतांचा मोठेपणा आहे; परंतु माझा मुलगा विद्वान् मूर्ख आहे हे मी जाणतो तेव्हा त्याला नोकरीच द्यायची असेल तर पेशव्यांनी आपली धोतरे धुण्यासाठी त्याला नेमावे!"

## कोणते चाक कमी महत्त्वाचे

व्हिक्टर ह्यूगो ह्याला एकदा असा प्रश्न विचारण्यात आला की आयुष्यात यशस्वी होण्यासाठी पैसा, श्रम किंवा बुद्धी ह्यापैकी कोणत्या गोष्टीची जरूरी आहे? तेव्हा ह्यूगो उत्तरला, "तुम्ही तीन चाकी सायकल चालविता तेव्हा कोणते चाक महत्त्वाचे नसते?"

—दि. भी. कराडकर









अनुक्रमणिका





नवरी मुलगी माझ्या पाया पडायला म्हणून खाली वाकली, पण मी तसंच तिला धरून उठवलं. लग्नाच्या पोषाखात ती नक्षत्रासारखी सुंदर दिसत होती. तिच्या जवळच उभा असलेला नवरा मुलगा चांगलाच उंच नि रुबाबदार होता. या लक्ष्मीनारायणाच्या जोडप्याकडे कितीही पाहिलं तरी पहाणाऱ्यांच्या नजरा काही निवत नव्हत्या. तेवढ्यात मागून कुणाचा तरी आवाज माझ्या कानी आला: "हे मुलीचे वडील वाटतं ?" त्याचबरोबर त्या प्रश्नाचं परस्पर उत्तरही ऐकू आलं : "छट्, आत्ता ती दोघं पाया पडताहेत ना ते तिचे आईवडील." "मग पहिल्यांदा या गृहस्थांच्या कशाला पाया पडली ती दोघं ? कदाचित् ते नवऱ्या मुलाचे वडील असतील." पहिला आवाज. नंतर मी दुसरीकडे गेलो नि यातलं पुढचं संभाषण काही मला ऐकू आले नाही. माझ्या पत्नीच्या डोळ्यात आसवं उभी राहिली होती, पण माझ्या ते लक्षात येऊ नये म्हणून झटकन् तिनं आपला चेहरा दुसरीकडे वळवला होता.

एव्हाना ते नवपरिणित जोडपं व्यासपीठावरील सोफ्यावर जाऊन बसलं होतं. दोघंही मोठ्या आनंदानं मित्र-नातेवाईकांच्या अभिनंदनाचा स्वीकार करीत होती. तिच्या डोळ्यातून जणू उतट आनंद वहात होता अन् ते पाहून माझंही मन अगदी सुखावत होतं.

ही नवरी मुलगी म्हणजे जणू माझीच मुलगी होती. माझ्या पत्नीलाही तिनं तेच सुख देण्याचा प्रयत्न केला होता, पण तिचं दुःख काही वेगळंच होतं. दुसऱ्या कशा-कशानं तिचं समाधान होण्यासारखं नव्हतं. "चला निघू या आपण आता," माझी पत्नी म्हणाली, "खूप वेळ झाला. लग्नाचा सारा सोहळा आपला पाहून झालाय् आता."

मागच्या आठवणीचं जबरदस्त ओझं पेलण्याच्या प्रयत्नात मलाही खूप थकवा आला होता, म्हणून मीही तिच्या म्हणण्याला संमती दिली अन् आम्ही लग्नाच्या हॉलमधून निघालो.

दाराशीच नवऱ्या मुलीचे आईवडील उभे होते.

"एवढ्यातच निघालात ?" मुलीच्या वडिलांनी मोठ्या आश्चर्यानं मला विचारलं, "ते काही नाही, जेवल्याशिवाय नाही जायचं. काय वाटेल ते झालं तरी तुम्हाला नाही असं जाऊ देणार. तुम्ही अंतःकरणाचा मोठेपणा दाखविला नसता तर आमच्या वासंतीला हे सुखाचे दिवस दिसले नसते. नाही, आज तुम्ही जेवल्याशिवाय जायचं नाही. आम्ही जाऊच देणार नाही तुम्हाला." त्यांच्या आग्रहातील कृतज्ञतेचा सूर मला स्पष्ट जाणवत होता.

"तसं नाही उगीच गैरसमज करून घेऊ नका. पण ही खूप दमली आहे नि तिला बरंही वाटत नाही. उगीच जेवणाचा आग्रह धरू नका." मी म्हणालो.

माझ्या पत्नीचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता अन् आपल्या मनाला आवर घालण्याची ती पराकाष्टा करीत आहे, हे तिच्या चेहऱ्यावरून सहज दिसत होतं. मुलीच्या वडिलांच्याही हे लक्षात आलं नि मग त्यांनी फारसा आग्रह धरला नाही.

आम्ही हॉलमधून निघालो. दाराला लावलेल्या आंब्याच्या डहाळ्या नि झेंडूच्या माळा पाहून मनावर कुणीतरी फुंकर मारल्यासारखं वाटलं. जवळच दोन केळी नवविवाहित दांपत्याच्या नव्या

सुखाची राखण करीत उभ्या होत्या. आम्हां दोघांच्या स्वभावात तसं खूपच अंतर असलं तरी या क्षणी मात्र आम्हा दोघांना एकच वाटत होतं. या लग्न समारंभाला आम्हां दोघांच्या आयुष्यातील एका मनस्वी आठवणीची राख-राख झाली होती.

घरी आलो तर घर खायला उठल्यासारखं वाटलं. या घरात आम्ही दोघंच होतो. दुसरं कुणी नाही. नसता एकाकीपणा. आल्याबरोबर लगेच ती दुपारच्या जेवणाच्या तयारीला लागली. ती जेवणार नाही हे मला माहीत होतं नि मागच्या आठवणी गोंजारण्यात मीही इतका गढून गेलो होतो की, जेवण मिळालं काय, न मिळालं काय, मला त्याची पर्वा नव्हती. पण तिची गरज मी ओळखून होतो. तिला आपलं मन कशात तरी गुंतवन ठेवायचं होतं. अन् म्हणूनच हे जेवणाचं निमित्त तिनं काढलं होतं.

"आज ती. . .ती असती तर सतरा वर्षांची असती," एक दीर्घ निःश्वास सोडून माझी पत्नी म्हणाली.

मी एक चकार शब्द न बोलता नुसतंच होकारार्थी मान डोलावली. माझ्यासारखाच तिलाही आपल्या मुलीचा आठव होत होता. आमच्या मुलीला आम्ही नीलाक्षी हे नाव ठेवलं होते. तिचे डोळेच मुळी तसे होते. निळसर करडे. या पोरीवर आमचं जिवापाड प्रेम होतं. ती अवखळ होती तेवढीच हुशारही होती. मूल होण्याची आशा आम्ही दोघांनीही सोडून दिली होती. अन् त्याच वेळी नीलाक्षी झाली. आमच्या शेजारच्या घरात वासंती नावाची आंधळी मुलगी होती, तिच्याशी ती तासन् तास खेळत बसे. नीलाक्षी झाली नि आमच्या संसाराला पूर्णता आली. घर कसं भरल्यासारखं वाटू लागलं. वासंती आंधळी होती, पण डॉक्टर म्हणत की ऑपरेशन करून तिला पुन्हा दृष्टी प्राप्त होण्यासारखी आहे. पण अडचण होती ती या ऑपरेशनसाठी दुसऱ्या कुणाची तरी बुबळं लागणार होती. ती सहजासहजी कुठून मिळणार ? अन् एक दिवस काळानं आपला डाव साधला. आम्ही दोघं नीलाक्षीला घेऊन बाजारहाट करायला गेलो होतो. रस्त्यातून चालताना एकदम हात सोडून धावायची निलीला सवय होती. खरं सांगायचं तर तिचा तो उत्साह नि द्वाडपणा पाहून आम्हाला बरं वाटत असे. पुढे असं काही होईल याची अंधुकसुद्धा कल्पना आम्हाला नव्हती. त्या दिवशीही मधला मोठा रस्ता ओलांडताना ती एकदम अशीच हात सोडून धावत सुटली. येणारी मोटर काही तिला दिसली नाही. अन् एका क्षणातच सारं काही संपलं.

निलीचा मृत देह जवळच्याच इस्पितळाच्या शवागारात नेण्यात आला. तिच्या चेहऱ्यावर एवढासुद्धा ओरखडा उठलेला नव्हता. फक्त केसांना तेवढी थोडी धूळ लागली होती. तिचे डोळे अजून उघडेच होते. तिचे डोळे निळसर करडे. उत्साहानं ओसंडणारे. व्रात्यपणानं चमकणारे. अजूनही त्यांच्यातील चमक तशीच होती. वाटायचं, आता ही उठेल नि पुन्हा हात सोडून धावू लागेल.

ते डोळे पाहिले नि मला एकदम वासंतीची आठवण झाली. त्या असीम दुःखाच्या क्षणीही केवळ एकाच विचारानं माझ्या मनाचा संपूर्ण ताबा घेतला होता. या निळ्या. . .करड्या डोळ्यातली ही विलक्षण चमक. ही चमक प्रतीक रूपानं तरी आपल्याला या जगात ठेवता येईल. मी माझं दुःख कसंबसं आवरलं नि डॉक्टरांना विचारलं. त्यांनी नीलाक्षीचे डोळे तपासले नि ते म्हणाले, "जरूर हे डोळे वापरता येतील. " आता एवढ्या दिवसांनी पुढचा तपशील आठवतो तो अगदी अंधुक अंधुक

पुढे लवकरच वासंतीच्या डोळ्यांचं ऑपरेशन झालं नि तिला दृष्टी प्राप्त झाली. आता तिच्या रूपानं जणू माझी नीलाक्षीच या पृथ्वीतलावर वावरत होती. वासंती. माझी नीलाक्षी. . . पहा, पहा माझ्या नीलाक्षीचे ते डोळे. . . निळसर करडे. . चमकदार. . द्वाड. . .





## सौ. मीरा शर्मा

ज्ञानकोशकार कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर व श्रीमती शीलवती केतकर यांच्या या सुकन्या! त्या इंग्रजीतून कथालेखन करीत असतात आणि त्यात त्यांनी जागतिक कीर्ती मिळविली आहे. अमेरिकेतील शिकागो विद्यापीठाच्या एशियन कल्चर विभागातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'MAHFIL' या त्रैमासिकातून त्या नेहमी लिहीत असतात. त्याशिवाय 'टाईम्स ऑफ इंडिया', 'स्टेट्स्मन', 'सण्डे स्टॅण्डर्ड', 'इंडियन एक्स्प्रेस', 'मिरर', 'त्रिवेणी' इत्यादि नियतकालिकातूनही त्यांच्या कथा व इतर साहित्य प्रसिद्ध होत असते.

'आहेर' ही कथा त्यांच्या 'गिफ्ट' या 'स्टेटस्मन' मध्ये प्रसिद्ध झालेल्या कथेवरून प्रा. सदानंद रेगे यांनी अनुवादित केली आहे.








वासंती आता मला नीलाक्षीच्या जागी होती. ती सारखी आमच्याच घरी असे. मी स्वतः तिचा अभ्यास घेई. तिच्या डोळ्यात मला माझी नीलाक्षी दिसे नि मनाच्या उजाड माळावरून वाऱ्याची एक थंडगार झुळूक येऊन गेल्यासारखं वाटे.

पण माझ्या पत्नीचं नेमकं याच्या उलट झालं होतं. तिला वासंती आपल्या नजरेसमोर क्षणभरही आलेली आवडायचं नाही. नीलाक्षी गेली म्हणूनच वासंतीला दृष्टी आली, हा विचारही तिला सहन होत नसे. पुढे पुढे वासंतीच्याही हे लक्षात आलं, तेव्हापास्नं शक्य तेवढं ती तिच्या-पास्नं दूरच रहात असे.

त्या दिवशी काय झालं होतं कुणास ठाऊक. पण मला एका मागोमाग एक अशी स्वप्नं पडत होती. त्यातलं एक स्वप्न माझा सारखा पाठपुरावा करीत होतं. मी लग्नाच्या मांडवात उभा होतो. भवती माणसांची चिक्कार गर्दी होती. नवरा-नवरी सोफ्यावर बसून आलेला अहेर घेत होती... अभिनंदनाच्या वर्षावात पार भिजून गेली होती. सनई-चौघड्याचे सूर मागून कुठून तरी मंद पण स्पष्टपणे ऐकू येत होते. तेवढ्यात अकस्मात् मांड-वाच्या दुसऱ्या टोकापासून एक मुलगी धावत धावत आली. तिनं जरीच्या किना-रीचा निळा परकर पोलका घातला होता. इकडे तिकडे न पहाता ती सरळ धावत होती. अरे, ही तर आपली निली. मी त्याच क्षणी तिला ओळखलं. तशीच परकर सावरीत सावरीत ती नवऱ्या मुलीकडे धावत गेली नि तिनं तिच्या हातात एक नक्षीकाम केलेली छोटी डबी दिली.

"उघडून पहा की !" अवखळपणे ती म्हणाली.

'वासंती, हा माझा खास अहेर बरं का !" नवऱ्या मुलीनं डबी उघडून पाहिली तर काय...

भात...
बोन..
बोन...
डोळे.. चमकदार, व्रात्य, हंसरे...
निळसर...
करडे..

मी एकदम दचकून उठलो तेव्हा सकाळ झाली होती अन् माझी पत्नी स्वैपाकघरात चहा करीत होती.

● ● ●

# गृहस्थ गाथा : १ :

## संस्कार

—ग. का. भडकमकर

(१) प्रथम गणेशाचं स्तोत्र म्हणावं अशी पद्धत आहे परंतु एकंदर दिवस सुखरूप-पणे पार पडावा म्हणून प्रथम उठल्या उठल्या चहा मिळावा (कपबशी न आपटली जाता) अशी इच्छा असल्यास पत्नीचं स्तोत्र म्हणावं. 'प्रणम्य शिरसा देवीम् अमुक पुत्रीं' असं म्हणून बायकोचं नाव घ्यावं. हल्ली अहो, 'मंडळी' बंद झालं असल्यामुळे आणि नाव घ्यायची सोय असल्यामुळे बायकोचं नाव घेता येतं. स्तोत्र म्हटल्यामुळे चहा मिळतो. चुकून चांगलाही होतो.

(२) आदल्या दिवशीच भाजी आणून न ठेवल्यामुळे पत्नी भडकलेली असते. पुरुषाला ऑफिसला जायची घाई असते. बायकोच्या भडकण्यामुळ तिचं तोंड वाकडं झालेलं असतं. शिवाय लग्न झाल्यपासून तिच्या आकारमानातही बदल झालेला असल्यामुळे 'वक्रतुंड महाकाय' असं प्रातःस्मरण करावं. एकूण काय, पत्नीचं स्मरण रात्री व सकाळी उठल्या-बरोबर करावं.

(३) उठल्याबरोबर भाजी किंवा संसारोपयोगी वस्तू आणण्याकरता खिशाचं किंवा पाकिटाचं दर्शन घ्यावं. अर्थातच तो किंवा ते रिकामंच असतं. साहजिकच बायकोकडे पैशाची मागणी करण्याची वेळ येते. तिच्या करात लक्ष्मी असल्यामुळे, (तिच्या) 'कराग्रे वसते लक्ष्मीः' असं तिचं करदर्शन घेऊन पत्नीवंदन करावं.

(४) सासू, सासरा, मेव्हणा, बायकोच्या माहेरची आणि ओळखीची माणसं (हो ऽ ऽ ऽ मेव्हणी राहूनच गेली) इत्यादि ग्रहांचा त्रास होऊ नये म्हणून प्रत्येक ग्रहाच्या खात्यात वर उल्लेखिलेल्यांपैकी एकेकाला टाकून 'त्या' ग्रहांची पीडा होऊ नये म्हणून सूर्यापासून ते शनीपर्यंत सर्व आकाशस्थ ग्रहांची करुणा भाकावी.





अनुक्रमणिका

(५) संध्याकाळी ऑफिसातून घरी आल्याबरोबर अमुक आणा, तमुक आणा, किंवा तुम्हाला येताना ते काम करून यायला सांगितलं होतं ते केलत का, वाण्याला सामान आणून टाकायला सांगितलंत का, बंबफोड चार दिवस झाले संपलीय्, गॅसचं सिलिंडर केव्हा येणार आहे इ. प्रश्नांची सरबत्ती होऊ नय व घरी आल्या-बरोबर पत्नीच्या मुखातून "नाथ, आज मी तुमच्यासाठी दडपेपोहे केले असून फक्कडसा चहादेखील तयार ठेवला आहे" अशा प्रकारची स्वर्गीय, अमृततुल्य वाक्यं कानी पडावीत अशी इच्छा असेल तर घरात पाऊल पडण्यापूर्वीच 'शुभं कुरु' अशा परमेश्वराची प्रार्थना करून ठेवावी. * *

## [ २ ] सण व व्रते

नागपंचमीपासून ते महाएकादशीपर्यंत अनेक सण व त्या अनुषंगाने व्रते सांगितली आहेत. सणाचं वैशिष्ट्य म्हणजे त्या दिवशी गोडधोड खायला मिळतं. खरं म्हणजे ज्या दिवशी पुरुषांना रुचकर अन्न खायला मिळतं तोच सण. ज्या दिवशी, ज्या त्या पदा-र्थाला जो तो रंग, जी ती चव व पोळ्यांना जो तो आकार दिसतो ती खरी दिवाळी. एरव्ही, समोरच्या ताटात जे काही पडेल ते मुकाट्याने पोटात ढकलणे हे व्रत आचरावे लागते.

**नागपंचमी** :—जे पानात पडेल ते मुकाट्याने आत ढकलण्याच्या व्रताचरणाने नागपंचमीच्या दिवशीचे दिंड जरी धिंड काढण्याच्या लायकीचे झाले असले तरी तक्रार करू नये. बायकोच्या पुंगीच्या आवाजावर नागाप्रमाणे पुरुषांनी डोलत राहावे. मान जर चांगल्या प्रकारे डोलत नसेल तर सर्जनकडे जाऊन योग्य ती व्यवस्था करून घ्यावी.

**नारळी पौर्णिमा** :—या दिवशी घरात होणारे सार पंचगव्या-प्रमाणे लागते त्यामुळे श्रावणी करण्याचे कारण नाही. स्त्रियांचे हल्लीचे पदर जानव्याप्रमाणेच असतात. पुरुषांनी वेगळी जानवी धारण करू नये. लग्नापूर्वीच्या सुंदर स्वप्नांना, आशाआकांक्षाना तर्पण द्यावे.

**मंगळागौरी** :—मंगळागौरीच्या दिवशी पूजेला आलेल्या 'मुलींना' जे खायला मिळते त्यामुळे त्यांची रात्री पोटं दुखायला लागतात आणि मग पोटशूळ उठल्याप्रमाणे आरडाओरडा आणि धांगडधिंगा करीत सर्वजणी मंगळागौरीला जागवतात आणि त्या रात्री पुरुषांना घरी न थांबण्याचे सबळ कारण मिळते. पुरुषांनी एकत्र जमून सिगरेटी फुंकत रमी खेळत बसावं. तक्रार होत नाही.

**पिठोरी अमावास्या** :—वरील सणांच्या दिवशीचे पदार्थ आपल्या यजमानाना खायला घालून पिठोरी अमावास्येच्या दिवशी बायका उपवास करतात. पुरुषांनीही, वेळीच धोका ओळखून, उपवास करावा. उपवासांच्या दिवशीचे उपवासाचे पदार्थही बिघड-तात. साहजिकच उप+वास असा संधी सोडवून पुरुषांनी जास्तीत जास्त वेळ परमेश्वराच्या सहवासात काढावा.

## ....हल्ली प्रत्येक कोर्सचा अभ्यासक्रम असतो.... संसार हा एक 'कोर्स'च आहे नि तो अवघडही आहे....तो थोडासा सुकर व्हावा म्हणून तर हा प्रपंच

**सत्यनारायण** :—सत्यनारायणाची पूजा अमुकच एका दिवशी करावी असे बंधन नाही. परंतु मंगलकार्य किंवा आपले ईप्सित पूर्ण झाल्यानंतर सत्यनारायणाची पूजा करण्याची प्रथा आहे. ज्या दिवशी बायको आंघोळीसाठी तगादा लावणार नाही, तिच्या सासू-सासऱ्यांबद्दल अगर नणंदांबद्दल अवाक्षरही उच्चारणार नाही, शेजारणीच्या पातळाबद्दल सांगणार नाही, अगर शेजारच्या बाईच्या नवऱ्याशी तुमची तुलना करणार नाही त्या दिवशी सत्यनारायणाची पूजा करावी.

**हरतालिका** :—कुमारिकांना इच्छित वर मिळावा, सौभाग्य-वतींचे सौभाग्य अखण्ड राहावे यासाठी स्त्रिया हे व्रत करतात. गद्दे-पंचविशीच्या वयात पुरुषांना तरुणी म्हणजे फुलपाखरं वाटत अस-तात, पण त्यांची (पुरुषांची) वृत्ती मात्र फुलपाखराची असते त्यामुळे अमुकच एका पाखरासाठी पुरुषांना हे व्रत करता येत नाही. प्रेम नावाच्या अनाकलनीय अवस्थेत काही काल पुरुष घालवतात व जे गळ्यात पडते त्याबद्दल मागाहून पश्चात्ताप करीत असतात. (हो, बाकी मागाहून जो केला जातो त्यालाच पश्चात्ताप म्हणतात नाही का ? सुरुवातीलाच जे कळतं त्याला दूरदर्शीपणा संबोधलं जातं) जे गळ्यात पडले त्याबद्दल पश्चात्ताप करीत असतानाच ते अखंड टिकावे म्हणून व्रत करण्याचे काय कारण ? हरतालिकेचा उद्देश असलेले कोणतेही व्रत न आचरण्याचे व्रत कटाक्षाने पाळावे. उपास करण्याचे कारण नाही. दणकून खा. दुसऱ्या दिवशी आपोआप उपास करावा लागेल.

**गणेश चतुर्थी** :—तरुण मंडळींनी हे व्रत जरूर पाळावे. घरी नाही, सार्वजनिक रीतीने. सार्वजनिक गणपती व त्यांची आरास पाहाण्याच्या मिषाने तरुणीकडे चोरून पाहावे, त्यांना धक्के द्यावेत, शक्य झाल्यास दंड दाबावेत. दुसऱ्या दिवशीच्या वर्तमानपत्रात 'काळ्या यादीत' नाव प्रसिद्ध होऊन मान्यता मिळते. क्वचित पोलिसांच्या कड्यात, अनंत चतुर्दशीच्या गणपतींच्या मिरवणुकी-प्रमाणे, वाजत गाजत मिरवणूक निघून गेटावर बोळवण होते.

**ऋषिपंचमी** :—पुरुषांचा हा अत्यंत आनंददायक सण आहे. या दिवशी पुरुषांनी, ज्याला आपल्या बायकोचे श्रम झाले असतील असे (म्हणजेच तिच्या हातचे) काहीही खायचे नसते. 'येथे हातचे सामान मिळेल' अशा अर्थाचे फलक काही काही दुकानातून दिसतात. ज्या हॉटेलातून 'येथे स्त्री हस्तस्पर्श-श्रम विरहित पदार्थ मिळतील' असे फलक असतील अशा हॉटेलात खायला जावे.

**नवरात्रोत्सव** :—गणेशोत्सवाप्रमाणेच अनक रात्री हा सण








चालत असल्यामुळे तरुणांना बरे वाटते. गावाबाहेरच्या देवीच्या (खरं म्हणजे गावातल्याच देवींच्या) दर्शनासाठी झुंबड उडते. या झुंबडीचा, तरुणींकडे कटाक्ष टाकणे, शाब्दिक आणि कागदाचे बाण मारणे, शारीरिक द्वैत मिटवण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे इ. कार्यक्रम करून तरुणांनी आपल्या डोक्यावरच्या झुलपात पराक्रमाचे अंकुर खोवावेत. आपल्या मैत्रिणीस हॉटेलातल्या फॅमिली रूममध्ये नेऊन खाऊपिऊ घालावे. अर्थात् पाकिटाचा अंदाज घ्यावा.

**महालक्ष्मी** :—पुष्कळ विवाहितांनी एकत्र जमून आपापल्या बायकांची शाब्दिक पूजा बांधायची असते. फक्त चित्पावन लोकांमध्येच पूजेबरोबर शाब्दिक आरासही केली जाते. कारण त्यांचा चिक्कू स्वभाव आणि बायकांचा उधळेपणा यातल्या महदंतरामुळे शब्दांना धार चांगली येते. .विवाहापूर्वी याच तरुणांनी कॉलेज-प्रवेशानंतर त्यांच्या सख्याच्या बायकांच्या बाबतीत चढत्या प्रमाणात खडे टाकलेले असतात. नोट्स, पावडर, रुमाल, वेण्या, रिबिनी, साड्या अशी षोडशोपचारे पूजा केलेली असते. जे तरुण अशी पूजा करतात तेच हॉटेलात जातात आणि एकत्र खातात. (बिल मात्र वेगवेगळे देतात). रात्रीच्या रात्री शून्यात नजर, काव्यप्रसूती, कल्पनाराज्यात नृत्य वगैरे प्रकार करून जागवतात. मुख्यत: आपल्या मनींच्या देवीच्या फोटोसमोर रूंजी घालतात. काही काही जणांच्या अंगात आणि संसारात ती देवी येते.

**दसरा** :—अबोला, न जेवणे, एकट्यानेच सिनेमाला जाणे, बायकोला न आवडणाऱ्या सिग्रेटी फुंकणे, इ. शस्त्रांची व अडकित्ता, वरवंटा, खलबत्ता, करवत इ. हत्यारांची पूजा करावी. बायको (खरे) सोने आणा म्हणून मागे लागते. खिशात पैसे नसतात. बायकोचा हट्ट पुरवण्यासाठी 'उसने' आणण्याकरिता पुरुषाने आपल्या घराचा उंबरठा ओलांडून सीमोल्लंघन करावे. यावेळी चांगला पोशाख करू नये. 'उसने' मिळण्याची शक्यता कमी होते. बायकोला (खरे) सोने मिळाल्यानंतर औक्षण चांगले होते.

**दिवाळी** :—हा सर्वात मोठा (खर्चाचा) सण आहे. फेस्टिव्हल अॅडव्हान्स घेऊन हा सण साजरा करतात.

**नरकचतुर्दशी** :—आंघोळीसाठी नवऱ्याला झोपेतून उठवण्याचा बायकोला हक्क असतो. झोप पुरी न झाल्यामुळे पुरुष आळसावलेल्या देहाने वावरत असतात. मुले फटाके उडवीत असतात. बायका तोंडानं फटाके फोडीत असतात. अभ्यंग स्नानानंतर इष्टमित्रांसह फराळ करावा अशी रीत आहे. पण ते इष्टमित्र येत नाहीत. फराळ आपणच खाणे भाग असते. दसऱ्याच्या दिवशी पुजलेल्या अडकित्ता, वरवंटा, खलबत्ता, करवत (करंजी चालेल) इ. हत्यारांनी सज्ज असावे.

**लक्ष्मीपूजन** :—दिवाळीत होणाऱ्या खर्चाचा आढावा घ्यावा व नसलेल्या लक्ष्मीची पूजा करावी.

**बलिप्रतिपदा** :—व्यापारी वर्षारंभ करतात. मध्यमवर्गीयांनी महिनाअखेर करावी.

**भाऊबीज** :—बहिणीला भावाची आठवण व्हावी असा एकमेव सण. ओवाळणी घालावी. तिच्या हातचे खायलादेखील हरकत नाही. कारण प्रसंग पुन्हा वर्षानंतरच येणार असतो.

**चंपाषष्ठी** :—पंचांगाप्रमाणे मार्गशीर्ष शु० षष्ठीला हा सण येतो; परंतु संसारात हा सण केव्हाही येऊ शकतो. खरे म्हणजे संसारात ज्या दिवशी 'चंपाषष्ठीचा' दिवस उगवत नाही तो सुदिन. त्यातून बायकोचे नाव चंपा वगैरे असल्यास बरे वाटते. चंपाषष्ठीच्या दिवशी तळी उचलण्याचा कार्यक्रम असतो. पुरुषांनी आपल्या बायकोच्या माहेरची आणि माहेरच्या मंडळींची तळी उचलून धरावी. जे पुरुष आळस न करता उठतात, प्रातर्विधी उरकून तावडतोब आंघोळ करतात, संध्याकाळी घरी येताना बायकोला वेणी घेऊन येतात, दरमहा साडी घेतात, सगळा (हो हो सगळा) पगार बायकोच्या हातात ठेवतात, बायकोच्या माहेरच्या मंडळींचा ग्रुप फोटो घरात दर्शनी भागात लावतात त्यांच्या बाबतीतच फक्त पंचांगातल्या चंपाषष्ठीचा कपिलाषष्ठी योग संभवतो.

**मकर संक्रांत** :—सूर्य मकर राशीत जातो त्या दिवसाला मकरसंक्रांत म्हणतात. ज्या मुहूर्तावर पुरुष लग्न करतात त्या क्षणापासून त्यांच्या आयुष्याची संक्रांत सुरू होते. स्त्री नावाचा पदार्थ त्यांच्या आयुष्यावर संक्रमण (आक्रमण ?) करतो. हलव्याच्या दाण्यात अगदी आत जसा तिळभरच तीळ असतो आणि बाकी काटेरी पाक असतो तद्वतच आयुष्याचं आहे. वर्षानुवर्षे गोड मानत संसार करावा तेव्हा आयुष्याच्या शेवटी तिळभर स्निग्धता मिळते. किंबहुना तिळभर सुखासाठीच (गालावरचा तीळ नव्हे) पुरुष सगळे आयुष्य पणाला लावतात. पहिल्या 'मकर संक्रांती'ला पुरुषाला सासुरवाडीहून (अशा वेळी 'बायकोचे माहेर' असा शब्दप्रयोग करण्याची प्रथा नाही) हलव्याचा सूट, हलव्याचा नारळ, हलव्याची अंगठी, हलव्याचा हार वगैरे 'काटेरी' दागिने मिळतात. हलव्याचे दागिने ल्यायल्यानंतर आपण खरोखरच कुठल्या जंजाळात सापडलो आहोत याची पुरुषांना जाणीव होते. बायका भरपूर तिळगूळ खातात पण आपल्या यजमानांशी गोड बोलत नाहीत. तिळगूळ खाऊन खाऊन बायकांचा आवाज बसला की पुरुषांना तेवढाच आनंद वाटतो.

**रथसप्तमी** :—बायका पाटावर रांगोळीने सूर्याच्या रथाचे चित्र काढतात. पुरुषांनी त्या निमित्ताने आपल्या बायकोची 'चित्रकला' पाहून घ्यावी. पाटावर भरपूर गंध शिंपडून आणि फुले वाहून बायका तो रथ सहसा दिसू देत नाहीत. इकडे पाटावरचा सूर्य झाकला गेला की खरा सूर्यदेखील ढगाआड जातो. रथसप्तमीच्या दिवशी दूध उतू जाऊ देण्याची मुभा असते. एरव्ही पुरुषांना स्टोवरच्या दुधाकडे लक्ष ठेवायला सांगून बायका न्हायला जातात तेव्हा हटकून दूध उतू जाऊन रथसप्तमी साजरी होते.

**होळी** :—फुटबॉल हा जसा फक्त पुरुषांचाच खेळ आहे त्याप्रमाणे होळी हा फक्त पुरुषांचा सण आहे. लग्नानंतर थोड्याच काळात






अनुक्रमणिका

पुरुषांच्या सगळ्या सुखस्वप्नांची (घरच्या मोठ्या मंडळींच्याही) होळी झाल्यामुळे 'बोंबा' मारण्याची (चांगला प्रतिशब्द : अपशब्द) पाळी येते. पूर्वीचे एखाद्या फटाकड्या मुलीवरचे प्रेम विसरून सोज्वळ मुलीशी लग्न करून देखील बोंब ठोकायची पाळी येते मग त्या फटाकड्या मुलीशी लग्न झाले असते तर किती बोंबा माराव्या लागल्या असत्या याची कल्पना करावी.

**रंगपंचमी** :—पंचांगाप्रमाणे हा सण होळीनंतर येतो; परंतु पुरुषांच्या बाबतीत क्रम उलटा होतो. सुरुवातीस रंगपंचमी, नंतर होळी. आणि होळी जी होरपळून सोडते तो पुन्हां रंगपंचमी येतच नाही. 'रंगपंचमी'चे दिवस आठवून पुढच्या रंगपंचमीच्या सणांना पुरुषांनी, '(रंग) पंचमीचा सण आला डोळे माझे ओले' हे गीत म्हणायला हरकत नाही.

**गुढीपाडवा** :—सकाळी अंगणात गुढी उभारावी व पूजा करून कडुनिंबाच्या कोवळ्या पानात मिरी, हरभऱ्याची डाळ, ओवा, मीठ वगैरे पदार्थ टाकून ते मिश्रण सर्वांनी खावे, अशी पद्धत आहे. हे सर्व पदार्थ बायकांच्या 'मिसळण्याच्या डब्यात' असतात. रोज पुरुषांना त्यांच्या हातून शिजणाऱ्या स्वयंपाकातून ह्याच मिश्रणाने युक्त असलेल्या फोडणीचे पदार्थ खायला मिळतात. गुढीपाडव्याच्या दिवशी मुद्दामहून वर सांगितलेले मिश्रण खाण्याची आवश्यकता नाही. जेवावयास गोडधोड करण्याची प्रथा आहे पण पूर्वी सांगितल्याप्रमाणे जे मिळेल ते गोड मानून घ्यावे. गुढी म्हणजे काठी. पूर्वीच्या जमान्यातले पुरुष काठीचा वापर करीत असत. हल्ली स्त्रियांकडे (धुणे वाळत घालण्याची) काठी व (कपड्यांना लावावयाचे) चिमटे असल्याने पुरुषांनी सावध असावे.

**वटसावित्री** :—'जन्मोजन्मी हाच पती मिळो' म्हणून स्त्रिया हे व्रत करतात. 'जन्मोजन्मी हीच बायको ?' ह्या विचाराने हबकलेल्या पुरुषांनी स्त्रियांना असले व्रत आचरण्यापासून परावृत्त करावे. हे 'त्रिरात्र' व्रत असून पुरुषांनी कटाक्षाने पाळावे.

**महा एकादशी** :—बायकांच्या मनासारख्या गोष्टी पुरुषांकडून घडल्या नाहीत की त्या गरम होतात व स्टो, गॅस जे काय असेल ते, थंड राहाते व पुरुषांना अनायासेच महा एकादशी घडते. अशा वेळी घरी थांबू नये. हॉटेलात जाऊन भोजन करावे. पगाराच्या दिवशी घडणाऱ्या अशा एकादशीस 'पगारी एकादशी' व एरव्ही घडणाऱ्या एकादशीस 'बिनपगारी एकादशी' म्हणतात. पुरुष हे बायकांप्रमाणे रडत नसल्यामुळे त्यांना ज्या एकादशा घडतात त्या 'निर्जळी' असतात. (क्रमशः)












—ना. शं. पत्की

# बावळऽऽट

**....माझ्यातलं अवसानच गेलं—माझं तिकीट बोगस असणारच. नको ते दाखवणं नि नको ते पोलिसांकडून मार खाणं—त्या कल्पनेनंच मी किंचाळलो—**

"अहो. इकडं या. काय तरी बावळटपणा हा."

आता आणखी काय बावळटपणा केला कुणास ठाऊक. सकाळी उठून चांगला बंब पेटवला, चहा केला, आंघोळ उरकून पूजा केली, भांडी आवरून ठेवली; तोपर्यंत बाईसाहेबांनी चांगली ताणून दिली होती. चहाही चांगला झाला होता. साखर वगैरे बेताची होती. तरी आपली कुरकूर काही आहे की नाही ? उगीच आपलं सारखं बावळट म्हणायचं. वैताग साला. तसा माझा चेहरा बावळट आहे. त्याला मी काय करू ? ते काही माझ्या हातात आहे ? लग्न करून घ्यायच्या वेळेस काय अक्कल गहाण ठेवली होती ? पण हे म्हणावं कुणी ? आता मोठे लोक म्हणतात की साधी रहाणी व उच्च विचारसरणी असावी म्हणून मी आपलं साधं रहातो. पॅंट न घालता धोतर नेसतो. कोट टोपी घालतो; पण म्हणून काय मी बावळट ठरतो ? खरं म्हटलं तर मी एकदा तसा प्रयत्न केला होता. सारखं सारखं बावळट म्हणतात म्हणून एकदा दसऱ्याला पॅंट घालून, चांगला भांग पाडून, सोनं लुटायला गेलो. तर हीच बायको म्हणाली होती,

"शोभतं का तुम्हाला हे या वयात ? लहान मुलासारखी थेरं करायची मेली. बरं पॅंट तरी नीट चांगली घालायची. किती ढगळ ती. चालताना सारखी फरफर वाजतेय आणि भांग तरी काय पाडलाय. आऽऽ हाहा. बांबूच्या बनासारखे केस ताठ उभे आहेत. सगळे लोक सारखे तुमच्या ऐवजी माझ्याकडेच पहायला लागले."

"काय तुझ्याकड ? माझ्या अशा कपड्यामुळे कदाचित तू सुंदर दिसत असावीस."—मी भीतभीत म्हणालो.

"काही वाटतं का असं बोलायला ? अहो लोक बघताहेत माझ्याकडे की या बाईने असा हा नवरा पत्करला कसा ?"

आता सांगा, माणसाने वागायचे कसे ? मी रागातच बाहेर गेलो. आता हिला जाब विचारायचाच की—की बाईसाहेब पहिल्यांदा तू माझ्याकडे तिरप्या नजरेने पहात एकदा म्हणाली होतीस, लाडिकपणे गालात हसत. "इश्श बावळटच आहात" त्या वेळेस मी गद्धेपंचविशीच्या कैफात होतो म्हणून ऐकून घेतले. पण म्हणून काय कायमचं बावळट म्हणायचं. तुला काय मुखत्यार पत्र बहाल केलं की काय ? जरा शर्टाचे बटण वरखाली झाले की 'काय बावळटपणा', टोपी दाबून डोक्यावर बसवली की काय बावळटपणा. रुपयातील राहिलेले पैसे भाजीवालीकडून घ्यायचे राहिले की 'काय बावळटपणा' माझ्या प्रत्येक कृतीत, अवयवात हिला बावळटपणाच दिसतो की काय कुणास ठाऊक ! मी पाय आपटीतच बाहेर आलो. डोळे लाल केले. केस विसकटले; पण बायकोने अशा काही नजरेने माझ्याकडे पाहिले जसे रिंगमास्तर








बाघाकडे पहातो. मी एकदम खाली आलो. म्हटलं आता भांडण होणार. पण काय झालं कुणास ठाऊक. एकदम ट्रॅन्स्फर सीन-सारखी बायको एकदम गळयातच येवून पडली.

"अहो आपल्याला अडीच लाखाचं बक्षीस लागलं. हे पहा नं. अन् तुम्ही काय पाहिलंत बावळटासारखं ?

आता बायकोचे हात गळयात असताना तिनं बावळट किंवा आणखीन् काही म्हटलं तरी चालतं. तिला पक्कं ठाऊक आहे. तिनं पुन्हा एकदा बावळट म्हणावयाच्या आत मीच स्वतः एकदा बावळट म्हणून घेतलं व तिचा कोटा पूर्ण केला.

"बघू बघू" मी तिच्या हातातून तिकीट हिसकावून घेतले. व नंबर वाचला. १९१४५८७ "बघ बरं पुन्हा एकदा" आणि समोर पहातो तो बायकोने कपाळाला हात लावलेला. बुबुळं फिरवलेली.

"अग, झालं काय ?" – मी विचारले.

"अहो व्हायचंय काय ? नंबर आलाय! १९१४५३७. सत्याऐंशी नाही थोडक्यात चुकलं की हो ऽऽ म्हणत तिने गळा काढला.

"तरी मी तुम्हाला म्हणत होते की आपल्या बाळयाच्या नावाने ऽऽ तिकीट काढा. पण स्वतःच्या नावानं काढलं. आता भोगा आपल्या कर्माची फळं."

"अग, कुणाच्या नावानं काय अन् नाही काय. उगीच आपलं काही तरी. आता बाळयाच्या नावाने काढलं असतं तर बक्षीस येते हे माहीत असतं तर त्याच्या नावानेच नसतं का घतलं ?" मी तिची समजूत काढण्याच्या प्रयत्नात होतो. पण .

"अरे माझ्या बाळया रे ऽऽऽ" म्हणतच घरात येणाऱ्या बाळयाच्या गळयात त्याची आई पडली. त्या बिचाऱ्याचा चेहरा जास्तच बावळट दिसायला लागला. अशा वेळेस काय करावे मला सुचेना.

"आई काय झालं ग ?"

"आपले अडीच लाख गेले रे राजाऽऽ"

"अडीच लाख घरातून गेले ? कमाल आहे तुमची. अहो अडीच लाख असताना मला नोकरी करावयास लावलीत ?"

त्याच्या बुद्धीची कीव करीत मी म्हणालो, "अरे शहाण्या या तिकिटावर आपल्याला अडीच लाख मिळाले असते पण थोडक्यात चुकले."

"म्हणजे ?"

"हा नंबर वाच. १९१४५८७ आहे ना ?"

"नाही. १९१४५३७ आहे" छापखान्यात प्रुफं तपासणाऱ्या बंडयाने माझी चूक दाखवून दिली.

"काय ?" मी व सौ. दोघेही ताडकन् उडालो. आता नशिबवान बाळया व त्याची आई माझ्याकडे अशा काही नजरेने पहात होते की हा प्राणी कोणत्या देशातून मागवला आहे.

"अहो. इंग्रजी आठ व तीन यांच्यातील फरक चष्मा नसल्यामुळे समजला नाही." –मी खुलासा केला. कारकुनीत जन्म गेल्यामुळे खुलासा करणे विशेष अवघड नव्हते मला. त्यातून आमचे गणितही थोडे कच्चेच होते म्हणा. कित्येक वेळा शाळेत मी हजार आकडा लिहिताना एकावर दोनच शून्ये लिहीत असे व मास्तरांनी हताश नजरेने माझ्याकडे पाहिले की माझी दृष्टी शून्यात जात असे.

मग घरातील आनंदाचे काय वर्णन करावे ? बायकोच्या गालावरील सुरकुत्या इस्त्री केलेल्या कपडयाप्रमाणे पार नाहीशा झाल्या होत्या. हातात तिकीट घेऊन ती दहादा आत जात होती व दहादा बाहेर येत होती. त्यामुळे माझ्या कामात मात्र व्यत्यय येत होता. ही गोष्ट कुणाला सांगू अन् कुणाला नको असं तिला होऊन गेले होते. पण शेजाऱ्यांना सांगून काही दगाफटका होईल असे आमच्या बाळयाने सांगितल्याने ती, तीच तीच गोष्ट आम्हा दोघांना माहीत असून सुद्धा सांगत होती व तिचा विरस होऊ नये म्हणून आम्हीही माना डोलावत होतो. शेवटी माना दुखायला लागल्या; मी व बाळया एकमेकाकडे केविलवाण्या नजरेने पहात होतो; पण करणार काय ? एकदा तर मनात विचार आला की च्यायला हे बक्षीस नसते मिळाले तर बरं झालं असतं. आज काही बाईसाहेबांचं लक्षण ठीक दिसत नाही. आज जेवायला मिळायचे काही चिन्ह नाही. सकाळपासून संध्याकाळपर्यंत मानाच डोलावत बसावं लागणार असं दिसतंय.

आता प्रश्न होता, मुंबईला जाऊन चेक आणायचा कोणी. मी तर असा बावळट. बायको एकटी जाणार कशी ? बाळयाला सुटी मिळत नव्हती. खरं म्हणजे तो जायला भीत होता कारण त्याने पूर्वी मुंबई पाहिली नव्हती. राहता राहिलो मी. त्याला इलाज नव्हता. नको असलेल्या पथ्याप्रमाणे होते ते.

"तेवढे आणाल का जपून. का कराल काही बावळटपणा ?"

"हे बघ. सारखं–बावळट म्हटलेलं मला आवडणार नाही. सांगून ठेवतो"–मी चिडलो. नाहीतर काय ?–"आता मी लाखाचा धनी आहे समजलीस. जरा नमून बोल." लाख रुपय अंगात संचारले होते.

"मी फर्स्ट क्लासने जाईन, फर्स्ट क्लासने येईन. मोठ्या लॉजमध्ये उतरेन. टॅक्सीने हिंडेन. कुणाला संशयसुद्धा येणार नाही हा मनुष्य बावळट आहे"–आणि मी जीभ चावली. नकळत मी स्वतःच स्वतःला बावळट म्हणवून घेतले होते.

"हे पहा. जा थर्डनेच. फर्स्टक्लासने चोऱ्या फार होतात म्हणे ! आणि साध्या हॉटेलातच उतरा. उगीच पैसे खर्चू नका." –तिने बजावले. मीही जास्ती हुज्जत न घालता काही दिवस तरी हिच्या कचाटयातून सुटका होणार म्हणून गप्प बसलो.

झोपेत मुंबई केव्हा आली हे कळलेच नाही. हमालाने उठवले तेव्हा कळले. मला वाटले घरातच आहे. लगेच नित्याच्या संवयीप्रमाणे "हात पसरून "कराग्रे वसते लक्ष्मी. . ." सुरू केले. पण जेव्हा तळहातात बायकोचा चेहरा रागाने पहात आहे हे पाहिल्यावर भानावर आलो. हमाल अजून माझ्याकडे पहातच होता.







तसा मुंबईला नवीन नव्हतो. मागे एकदा मामाच्या मुंजीत आलो होतो; पण त्यावेळेस मुंबई इतकी अफाट नव्हती. म्हणून सरळ पोलिसालाच विचारले की सेक्रेटरीयटला जावयाची बस कोणती ?

"काय राव, बक्षिस बिक्षीस लागलंय का ?" माझ्या वेशाकडे पहात त्याने खो-खो हसत विचारले.

"नाही हो. जरा पेन्शनीचं काम आहे" –मुंबईला उतरल्यावर मुंबईचा बेरकी-पणाचा गुण लागला. त्याने सांगितल्या-प्रमाणे सेक्रेटरीयटला गेलो.

"काय दांडेकर इकडे कुणीकडे ?"– मागून आवाज आला. मी पाहिले तर आमच्या वाळयाचा मित्र. केसाची झुलपे पुढे झुकलेली, तंग पँटमधून पायाची हाडे डोकावत होती. पण मान भलतीच ताठ.

"काय एखादे बक्षिस लागलेय काय." त्याने हसत विचारले.

"नाही रे बाबा, जरा पेन्शनीचे काम आहे." "तू कुणीकडे ?"

त्याने कॉलर ताठ केली. मान किंचित तिरपी करून झुकवली आणि तो म्हणाला,

"ए सी सिरीजचे पहिले बक्षीस लागलेय म्हटलं." आणि त्याने अशा काही तुच्छतेने माझ्याकडे पाहिले की विचारू नका.

"काय ?" मी चमकलो. कारण एसी सिरीजचे तिकीट तर माझ्या खिशात होते. ही काय भानगड आहे ?

"काय खरं नाही वाटत ?" त्याने मला तिकीट दाखवले. मी चाटच पडलो. हे तर माझेच तिकीट. मी खिशात हात घालून पाहिला तर माझं तिकीट खिशात व्यव-स्थित होते. मग ही काय भानगड असावी ? डोके गरगरू लागले.

आम्ही ऑफिसात गेलो. टाईपरायट-रच्या खडखडांच्या तालावर कारकून मंडळी बोलत होती.

"अरे नाडकर्णी. मागच्या खेपेच्या बोगस तिकिटाचे काय झाले ?"

"अरे व्हायचंय काय ? बसला असेल खडी फोडत."

माझ्यातले अवसान गेले. माझे तिकीट तर बोगस नाही ना ? नको ते दाखवणे व मार खाणे. पोलिसाचा मार फार भयंकर असतो म्हणे. पहिल्यांदा नडगीवरच मार-तात म्हणे. कुणी थोबाडावर, कुणी पाठीत, कुणी पोटात.

"आईऽऽग" मी किंचाळलो.

"काय झालं हो ?"

"काही नाही". मी भानावर आलो. "हा टेबलाचा कोपरा लागला."–माझ्या हातापायातील बळ गेले होते; पायात कापरे भरले होते; डोळ्यापुढे अंधेरी येत होती, पोटात गोळा उठला होता, म्हटलं नको ही विषाची परीक्षा पहायला. ज्या अर्थी बंड्याचा मित्र इतक्या ताठ मानेने वावरतोय त्या अर्थी आपलेच तिकीट बोगस असावे. मी काही मागचा पुढचा विचार केला नाही. परत फिरलो. स्टेशनवर आलो. सोलापुरचे तिकीट काढले व गाडीची वाट पहात बसलो.

गाडीत जागाही चांगली मिळाली. बर्थवर मस्तपैकी झोपलो. आणि स्वप्नाने झडप घातली. कुणीतरी अक्राळ विक्राळ राक्षस, दोन शिंगे असलेला; माझ्या बायकोच्या चेहऱ्याचा, मला कोर्टात घेऊन जात होता. इतक्यात कोर्ट दिसू लागले. न्यायाधीश म्हणाले,

"याला फाशीची शिक्षा द्यावी."

"पणं माझा गुन्हा काय ?"

"त्या परांजप्याचे तिकीट खरे निघाले. माहीत आहे ना ?"

"हो."

"मग तुझे तिकीट खोटे आहे, कबूल ना ?"

"हो कबूल."

"ते चालवायला तू गेला होतास की नाही ?"

"हो."

"गुन्हा कबूल आहे ना. मग. अजून जास्ती शिक्षा व्हावयास पाहिजे; पण पहिलाच गुन्हा आहे. म्हणून...."

"अहो पण मी बक्षीस घेतले नाही होऽऽ" मी ओरडणार होतो पण न्याया-धीश निघून गेले होते. त्या राक्षसाने मला एका खोलीत नेले. फासाचा दोर गळ्यात अडकवला. माझे प्रेत लोंबकळू लागले. व धपकन कोसळले. आणि मी बर्थवरून खाली कोसळलो, पेंगुळलेल्या पॅसेंजर्सवर. धोतराचा कासोटा फिटलेला, बनियन-मधून जानवे बाहेर आलेले, व कानाला अडकलेले; बहुतेक धोतर ओले झाले असावे.

बसलेल्या लोकांच्या शिव्या खात खात मी कमरेला धरून–(माझ्याच) उठलो. कुणी रडत होते, कुणी हसत होते; पण शिव्या देणारेच जास्त होते. सगळ्या लोकांची नम्रपणे माफी मागितली मार खाल्लेल्या मल्याच्या थाटात. बहुधा त्यांनी क्षमा केली असावी. मी पुन्हा बर्थवर चढून बसलो. ब्रह्मानंदी टाळी लागण्याच्या बेतात असावी. अधून मधून पुन्हा कोर्ट, न्यायाधीशाच्या मूर्ती, दिसतच होत्या. मान सारखी 'नाही नाही' म्हणतच होती.

"तिकीट प्लीज."

मी तिकीट काढून दाखवले. आणि डब्यात हशा पिकला.

"काय बावळट आहे. लॉटरीचे तिकीट दाखवतोय." कुणीतरी म्हणाले, मी जागा झालो. माझी चूक मला कळून चुकली व त्यांना रेल्वेचे तिकीट दाखवले. तितक्यात पुणे आलेच. आमची स्वारी उतरली. चहा वगैरे घेऊन व जरा खाऊन गाडीची वाट पहात बसलो. अजून चांगले दोन तास होते. आता उद्योग काय करावा ? शेजारचा वर्तमानपत्र वाचीत होता. वाचावे म्हटले तर चष्मा विसरून आलो होतो. दिसेना, आणखीन पुढे झुकलो. वाचणाऱ्याने माझी मान बाजूला काढली, व वाचायला सुरवात केली. पण तेवढ्या अवधीत कुणाचा तरी मोठा फोटो दिसला. पुन्हा उत्सुकता जागी झाली. पूर्वीपेक्षा जरा जास्तच डोकावलो. त्या गृहस्थाने माझी मान पुन्हा बाजूला काढली. आपला चष्मा माझ्या डोळ्यावर ठेवला. व वर्त-






मानपत्र माझ्या हातात दिले. मोठा खिलाडूवृत्तीचा वाटला. मीही त्याचा चष्मा व वर्तमानपत्र वाचल्यावर परत देणारच होतो; पण पहिल्याच पानावर आमच्या वाळयाच्या मित्राचा फोटो. खाली लिहिले होते. 'हाच तो बोगस तिकिटाचा धनी.' मी कपाळावर हात मारून घेतला. त्या धक्क्याने डोळ्यावरचा चष्मा उडाला व त्याच्या मालकाने बरोबर झेलला व डोळ्याला लावला. मीही त्याला त्याचे वर्तमानपत्र दिले. त्यावर तो उपकार झाले का म्हणाला ते समजले नाही. असो! आता पुन्हा मुंबईला जावे लागणार. पुन्हा तो प्रवास, ती कटकट. अडीच लाख मिळवायचे म्हणजे भारीच कष्ट पडतात बुवा!

मोठ्या ऐटीत ऑफीसात शिरलो. आता माझी मान ताठ होती. मला कुणाची भीती नव्हती. नेपोलियनाचे साम्राज्य पायाखाली तुडवल्याचा भास होत होता. डोळ्यात मग्रूरीची झाक असावी.

"अहो चेक द्याना लवकर. मला वेळ होतोय." मी कपाळावर आठ्या घालून कारकुनावर खेकसलो, ऑफिसात साहेब खेकसतात तसे. तो कारकून बघायलाच लागला. असा ताठ मनुष्य त्याने पाहिला नसावा. काय प्रत्येकजण अदबीने बोलत होता पण. त्या अदबीची किंमत शंभर रुपये ठरली; कारकुनापासून शिपायापर्यंत बक्षिसी देण्याची.

मी घरी गेलोच नाही. म्हणजे तसा मला काही नाद नाही. सरळ परस्पर बँकेत गेलो. व चेक खात्यात जमा करून टाकला. घरी येतो तो शंभर सव्वाशे माणसं दाराशी. मनात नाही नाही ते अशुभ येवून गेले. जाताना सौभाग्यवतीची तब्येत काळजी करण्यासारखीच होती. तिला हर्षवायू झाला की काय कोण जाणे? मन चिंती ते वैरी न चिंती. पण नंतर कळले की ही मंडळी माझ्या स्वागतासाठी उभी आहेत. दोन दिवसापूर्वी रस्त्यातून जाताना तोंड फिरवून किंवा रस्ता बदलून जाणाऱ्यांपासून ते 'थेरड्याची नजर पहा कशी आहे ती' असे चक्क तोंडावर म्हणण्यापर्यंतच्या सर्व थरातील माणसे त्यात होती. चहाच्या प्रत्येक घोटाबरोबर एकेक स्तुतीसुमन वाहिले जावयाचे. आमच्या सौ.ला व नशिबवान बंड्याला ते खरेच वाटून ती उगीचच लाजत होती. मी मिशीतल्या मिशीत हसत त्यांच्याकडे बेरकी नजरेने पहात होतो. तरीही बायको म्हणालीच ते गेल्यावर, "तुम्ही त्या वेळेस फारच बावळट दिसत होता." अशी ताडकन मुस्कटात मारावी असा राग आला.

दोन दिवस अभिनंदनपर पत्रे वाचण्यात कशीबशी गेली असतील तो आमचे लांबचे नातेवाईक लंबोदर दारात हजर. पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत जबडा वासून स्टेजवर एखाद्या नटाने एंट्री घ्यावी तशी दारातून आत शिरत त्यांनी विचारले,

"आहेत का घरात?

"या. या." मी कोचावर ऐसपैस रेलत नवीन शेरवानीचा घोळ आवरीत म्हटले. "काय इकडे कुणीकडे वाट चुकलात?"

"तसं काही नाही. सहज आपलं. बरेच दिवसात भेट झाली नव्हती. म्हटलं भेटावं. (अरे चोरा).

"आमचं भाग्यच म्हणायचं. असो! काय काम काढलंत?"

"तुम्हाला माहीत असेलच, आमच्या चिंगीचं लग्न ठरलं." 'मला माहीत असण्याचं कारण काय. तू काय मला साखरपुड्याला बोलावले होतेस?' मी मनात म्हटले.

"अस्स अस्स. म्हणजे आमंत्रण द्यायला आलात म्हणा की"—मी.

"नाही हो."—आणि त्याने जीभ चावलेली चक्क पाहिली. त्याची चूक त्याला कळून चुकली होती. "आमंत्रण तर देणारच आहे. पण जरा अडचण आहे."

"आलं लक्षात"—मी.

"त्याचं असं आहे. हे आजकालचे नवरे फारच शिष्ट बुवा! काय हुंडा मागतात की काय? स्वतःला एखादा राजा समजतात की काय कोण जाणे. वसग्याची ऐट बघितली की वाटतं जीव जातोय की काय—आमचा—त्याचा नाही. सांगायचं कारण असं, एक हजार कमी पडताहेत. म्हटलं आमचं नशीब चांगले की आपल्याला बक्षीस लागले.

"वा: तुमचे नशीब चांगले म्हणून आम्हाला बक्षीस लागले?"

तसं नाही म्हणायचं मला. की आमच्या वेळेस अगदी तुम्हाला बक्षीस लागले. आता तुम्ही काय हजार नाही म्हणणार थोडंच!"

'ग्रेट फाईट'

युद्ध-की फासं!



अनुक्रमणिका

"आता तुम्हाला नाही म्हूणून कसे चालेल ?"—मी.

"काय वामनराव, हातात पैसा असताना देण्यात काही मजा असते नाही ?"

"आणि तो परत येण्यासारखा नसला ना, तर फारच मजा येते"—मी एक टोला हाणलाच. अगदी सहन होईना. मुलाच्या लग्नात आमंत्रण तरी केले होतेस का ? आठव, लेका. आता हजार मागतोस. त्याला टोला समजला असावा. 'बघू नंतर, बघू नंतर' करीतच त्याने काढता पाय घतला. मीही त्याला विरोध केला नाही. सौ.ने त्यांच्याकरिता आणलेला चहाही मीच घेतला. व आता अशा प्रकारच्या नवीन आघाडीला तोंड देण्यासाठी मी मनात आडाखे बांधू लागलो. हे लोक मला वर्षात पहिल्या जागी नेऊन बसवणार यात शंका नव्हतीच.

असाच एके दिवशी जरा दुपारचा डोळा लागतो न लागतो तोच दार खडखडायला लागले. वाऱ्याने खडखडत असेल म्हणून तसाच पडून राहिलो. पण आता दार मोडून पडते की काय असे वाटायला लागले तेव्हा दार उघडले. तो आमचा बाबूराव वाऱ्यासारखा आत घुसला. घामाने ओलाचिंब झालेला, चेहरा पडलेला; ताडकन् कपाळावर हात मारून घेऊन तो कोचावर पट्कन् बसला. मी बाहेर डोकावून पाहिले की याच्यामागे पोलीस वगैरे लागलेत की काय ?

"वामनराव." तो अगदी हलक्या आवाजात म्हणाला.

"काय बाबूराव ?" मी विचारले.

"वामनराव. अगोदर पाणी आणा. अहो घात झाला. मी पाणी आणण्यासाठी आत पळालो. हो, पाण्याकरिता त्याने जीव सोडायला नको !

"वामनराव, तुमच्याशिवाय कोणी मला वाचवू शकणार नाही. हो ऽ ऽ "—त्याने डोळ्यात आंसवे आणून म्हटले. चेहरा अगदी पिजून गेला होता." नाही म्हणू नका. माझ्यावर चोरीचा आळ आलाय. दोन हजार रुपयाचा."—नाटकाचा दुसरा प्रवेश रंगात आला होता. मी खिडकीतून बाहेरचा देखावा पहात होतो. शत्रूची चाहूल लागली होती. तयारी होतीच.

"वामनराव, मागचे काही मनात आणू नका. तुमचे प्रमोशन मी खोटे सांगून लटपटी करून मिळवले. चार कच्ची बच्ची आहेत. पाठीवर मारा पण पोटावर मारू नका."—तो अगदी पाया पडण्याच्या बेतात होता. नवशिक्या नटाप्रमाणे तो ताडताड बोलत होता वाक्ये पाठ केल्याप्रमाणे; पण त्याचा काही माझ्यावर परिणाम होईना. शेवटी तर त्याने फडाफड थोबाडीत काय मारून घेतल्या; डोळ्यात पाणी काय आणले; डोळे काय फिरवले, नाना थेरं केली. शेवटी शर्टही टरकावण्याच्या बेतात होता. मी म्हणालो बाबूराव थांबा जरा, मी जाऊन येतो आत."—त्याच्या चेहऱ्यावर जिंकल्याची झलक चमकून गेली. मी मागच्या दाराने सरळ शेजारी गेलो, त्याच्या ऑफिसात फोन केला. व खरी माहिती काढून घेतली. माझा अंदाज खरा ठरला. मी परत आलो. अजूनही बाबूरावाची प्रकृती ठीक नव्हती.

"बाबूराव, हा घ्या रुपाया."

"रुपाया ?"

"तुमची तब्येत ठीक नाही. चालत जाऊ नका. टांग्याने जा."—त्याने रुपयाची नोट परत माझ्या तोंडावर का फेकली हे समजू शकतो, पण त्याने माझ्याकडे अशा नजरेने का बघितले ते काही कळले नाही.

संध्याकाळी आमची कॅबिनेट मीटिंग भरली. मी, सौभाग्यवती व नशिबवान बाळ्या. या आघाडीला कसे तोंड द्यावयाचे याच्या वाटाघाटी सुरू झाल्या.

"अहो, आपल्याजवळ आहेत पैसे म्हणून मागताहेत बिचारे. नव्हते तेव्हा कोणी मागितले का ? अडचणीत असतात बिचारे."—सौ.

"वा : असे म्हणून कसे चालेल ? अजून आपल्याला मोटार घ्यायचीय, बंगला घ्यायचाय. च्यायला या नातेवाईकांनी अगदी भंडावून सोडलंय. यांच्या बायकांची बाळंतपणं आमच्या मुळावर, यांच्या मुलांची लग्नं आमच्या जिवावर. आत्ताच यांच्या मुलाला विलायतेला जाण्याचा चान्स मिळेल. कुणाचे काही अन् कुणाचे काही. थोडा विचार करायला सुद्धा सवड देत नाहीत. ही पहा आता दारावर टकटक सुरू झाली. सरक, पळू दे मला आत. सांग त्याला घरात नाहीत म्हणून."—मी आत पळालो.

"अहो ते घरात नाहीत"—एवढे ऐकू आले.

"आता घरात बसायला काय झालं ? अडीच लाख मिळाले आहेत. आता तरी तीन महिन्याचं थकलेलं भाडं देऊन टाका म्हणावं."—मालकाचा मुनीम असावा. तसा मी बाहेर आलो. मी बरेच बोलणार होतो, पण तो निघूनच गेला आणि पुन्हा मीटिंगला सुरुवात झाली.

"आता या चक्रव्यूहातून बाहेर पडावयाचे कसे ?" मी.

"आपण एक झक्कपैकी प्रेसच घेऊ. आचार्य अत्रे यांच्या तोडीचे लिखाण लिहितो."—नशिबवान बाळ्या.

मी त्याच्याकडे तुच्छतेने पहाण्याशिवाय काही केले नाही. त्याची लायकी मला माहीत होती. नाही तरी आमचेच लेकरू ते !

"आता कुठेतरी पळून जाण्याशिवाय मार्ग नाही." बाळ्याची आई बरेच दिवसात विचार करून बोलली.

"मस्त आइडिया. सुवर्णमध्य सापडला."

"काय ?"—म्हणत सौ.चा व बाळ्याचा कॅमेरा माझ्याकडे वळला.

"आपण सर्वजण दोन तीन महिने लांब ट्रिप काढायची. तोपर्यंत चांगले तीन चार हजार व्याजापोटी जमतील त्यातून या लोकांची देणी भागवून कसाबसा संसार करता येईल की नाही. ?"

"हो बाई खरेच. नातेवाईकांनाही दुखवायला नको. व आपलाही पैसा कमी व्हायला नको." बायकोने माझ्याकडे बऱ्याच दिवसांनी कौतुकाने बघितले.

"आणि शिवाय ते परत आले नाहीत तरी काही काळजी नाही. कारण फक्त व्याजच जाईल"—नशिबवान बाळ्या.

माझ्या पश्चात हा किती संभाळून ठेवणार याची कल्पना आली.

आणि या मोठ्या पेचप्रसंगातून चांगला मार्ग काढून संसार मोडण्याचा गंभीर प्रसंग टाळला.

त्यानंतर मात्र बायकोनं मला पुन्हा कधी बावळट म्हटलं नाही. ● ● ●








अनुक्रमणिका

**परिसंवाद**

—डॉ. श्री. शां. आजगांवकर

**प्रस्थापितांविरुद्ध बंडाचा झेंडा उंचावून पुढे येणारी तरुण पिढी खरोखरच कोणत्या उद्देशाने त्या त्या क्षेत्रात येत असते याचा मागोवा घेतल्याशिवाय त्या व्यक्तीला बंडखोर म्हणून गौरविणे धोक्याचेच ठरेल....**




# तथाकथित बंडखोरी केवळ स्वार्थासाठी

समाजाच्या प्रगतीसाठी, ज्यांच्यामध्ये जिवंतपणा आहे अशा व्यक्ती 'प्रस्थापितां'-विरुद्ध बंड करण्यास अनंत काळापासून प्रवृत्त झाल्या आहेत. त्यांपैकी काहींचे बंड यशस्वी होते तर काही, आपल्या काळाच्या फार पुढे असल्यामुळे, विस्मृतीमध्ये गाडल्या जातात. मानवाची आतापर्यंत प्रगती झाली आहे ती अशा बंडखोर व्यक्तीमुळेच. राजकारणातील बंडे इतिहासामध्ये नमूद केली जातात. विज्ञान, साहित्य, समाजजीवन, शिक्षण अथवा धर्मशास्त्र यांमध्ये जी प्रगती दिसत आहे ती या बंडखोरीमुळेच. पण बंडखोरीचे उद्देश समाजहित संवर्धनासाठी असले तर त्याचा समाजाच्या प्रगतीसाठी उपयोग होतो पण प्रस्थापितांविरुद्ध केलेले बंड केवळ स्वार्थासाठी असले तर त्याचा परिणाम समाज विघटनेमध्ये होतो. म्हणून प्रस्थापितांविरुद्ध बंडाच्या मागची भूमिका काय आहे हे लक्षात घेणे अवश्य ठरते.

बुद्ध, ख्रिस्त, ज्ञानेश्वर, शिवाजी, आगरकर, फुले, टिळक, गांधी हे त्या त्या काळचे बंडखोरच होत. पाश्चात्य देशामध्ये गॅलिलिओ, कोपर्निकस, मार्टिन ल्यूथर, कार्ल मार्क्स यानीसुद्धा प्रस्थापितांविरुद्ध बंडेच केली. पण त्यांच्या बंडखोरीचा उद्देश स्वकेंद्रित नसून सामाजिक वा वैज्ञानिक दृष्टिकोनाचा होता. त्यांचा त्यामध्ये वैयक्तिक स्वार्थ नव्हता आणि अशा बंडखोरीमध्ये संयम आणि शुचिता होती. सत्याबद्दल चाड होती, अन्यायाबद्दल चीड होती आणि प्रगतीबद्दल ओढ होती. त्याचबरोबर आपल्या तत्त्वाबद्दल वाटेल तो त्याग करण्याची धमक होती, कारण त्यांना आपण हाती घेतलेले काम हे दैवी कार्य आहे, त्यामध्ये वैयक्तिक क्षुद्र स्वार्थ नाही ही जाणीव होती. समाजाला अशा बंडखोरांची अत्यंत जरूरी आहे. प्रस्थापित सत्तेविरुद्ध बंडे झाली म्हणूनच आजवरची प्रगती झाली, नाही तर समाज डबक्यासारखा झाला असता आणि त्यावर शेवाळ माजले असते. जीवनाचा प्रवाह थांबला की प्रगती थांबली आणि प्रगती थांबली की पुढील पाऊल अधोगतीकडेच ! ही अधोगती बंडखोर थांबवितात—समाजामध्ये नवतेज आणतात.

ही झाली प्रस्थापिततेविरुद्ध बंडाच्या आवश्यकतेची तात्त्विक भूमिका. पण सध्या राजकारण, साहित्य, समाजजीवन, शिक्षण इत्यादि क्षेत्रांमध्ये बंडखोरीची लाट उसळली आहे. प्रस्थापितांनी प्रगतीची वाट रोखली आहे अशा आरोळ्या उठत आहेत, त्या कितपत योग्य आहेत याचाही विचार समतोल वृत्तीने होणे अवश्य आहे.

### सत्यासाठी की सत्तेसाठी ?

कोणत्याही क्षेत्रातील प्रस्थापितांविरुद्ध जेव्हा बंडखोरी होते तेव्हा त्याला काही हितसंबंधियांचा विरोध असणे हे स्वाभाविकच आहे, पण ही बंडखोरी सत्तेसाठी किंवा वैयक्तिक स्वार्थासाठी नसून समाजकल्याणाच्या हेतूने जेव्हा केली जाते तेव्हा तिला सुरुवातीला नसला तरी कालांतराने सामान्य जनतेचा पाठिंबा मिळतो आणि बंडखोरी यशस्वी होते. पुष्कळदा राजकीय उद्देशाने केलेली बंडखोरी सत्ता आणि स्वार्थ याने पटकन् यशस्वी झाल्यासारखी आढळते पण ही बंडखोरी तात्पुरती यशस्वी ठरली तरी कालाच्या उदरात गडप होते, कारण ती शाश्वत मूल्यांसाठी केलेली बंडखोरी नव्हे ! हाच प्रकार निरनिराळ्या क्षेत्रात आज दिसत असलेल्या तथाकथित बंडखोरीचाही म्हणता येईल. पुरोगामित्व हा आजकाल एक सवंग झालेला शब्द आहे व जे आपल्याबरोबर नाहीत त्यांना प्रतिगामी म्हणून त्यांच्याविरुद्ध बंड करण्यास या शब्दाचा उपयोग केला जातो. राजकारण, समाजकारण, साहित्य या व



अनुक्रमणिका

इतर क्षेत्रात आज वंडखोरी आहे ती सत्यासाठी की सत्तेसाठी हा प्रश्न आहे सत्याचा मुखवटा लावून पुष्कळदा सत्तास्पर्धेचा हा खेळ आहे असे सामान्य माणसाला वाटले तर आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. साहित्य क्षेत्रातील बंडखोरी ही सत्यं, शिवं आणि सुंदरम् याच्याविरुद्ध उघडली आहे यात समाजाचा कळवळा आणि त्याचे कल्याण करण्याची पोटतिडिक आहे की केवळ खपेल ते विकण्यासाठीची बंडखोरी आहे हे समजत नाही. या बंडखोरीमध्ये पुष्कळदा सत्य थोडे–कारण प्रत्यक्ष अनुभूतीपेक्षा कल्पनाविलासच जास्त, शिवम् तर नाहीच आणि सुंदरम्च्या ऐवजी गटारदर्शन ! सर्वांना माहिती आहे की शरीराच्या सौंदर्याबरोबर त्यात घाणही असते पण ती सामान्य जनाच्या प्रदर्शनासाठी नसते. त्या भागाशी डॉक्टरचा संबंध येतो. सामाजिक रोग हरण करणाऱ्या साहित्यिकाने समाजाचा गलिच्छ भाग दूर करण्याचे हेतूने, साहित्यामध्ये क्रांती घडवून आणण्याच्या दृष्टीने साहित्यिक बंडखोरी करणे, निराळे दररोज मिष्टान्न खाऊन खाऊन बेरुची झालेल्या जिभेला जशी आंबट, खारट पदार्थांची गोडी वाटते तशी शुद्ध सात्त्विक वाङ्मयाचा कंटाळा आला म्हणून–बदल म्हणून पोट भरून वाङ्मय लिहिणे आणि त्याला आपण साहित्यिक बंडखोरी करीत आहो असे म्हणणे ही प्रस्थापितांविरुद्धांची बंडखोरी नव्हे ! गेल्या शतकात महात्मा फुले यांनी केली ती प्रस्थापितांविरुद्धची साहित्यिक बंडखोरी, आगरकरांनी केली ती साहित्यिक बंडखोरी. अशी बंडखोरी आज मराठी वाङ्मयात कोठे दिसत आहे ? आजची बंडखोरी ही केवळ पोटभरू बंडखोरी समाजाच्या साहित्यिक रुचीमध्ये पालट केला म्हणजे बंडखोरी होत नाही. क्रांतीदर्शी लेखक निराळे आणि आजचे तथाकथित "बंडखोर" साहित्यिक निराळे. आजकाल राजकारण, समाजकारण, साहित्यादी क्षेत्रांमध्ये क्रांतीची भाषा बोलणारे व स्वतःस 'तरुण तुर्क' म्हणवून घेणारे अनेक बंडखोर प्रसिद्धीच्या प्रकाशझोतात येताना दिसत आहेत. पण त्यामध्ये हौतात्म्याची आच नाही, पारतंत्र्यातील बंडखोरीच्या पासंगाला ती पोचू शकत नाही. वासुदेव बळवंत फडके यांच्यापासून सुभाषचंद्र बोसांपर्यंत राजकारणामध्ये म. फुले यांच्यापासून भारतरत्न महर्षि कर्व्यांपर्यंत, समाजसुधारकांमध्ये चिपळूणकरांपासून–मर्ढेकरांपर्यंत साहित्य क्षेत्रामध्ये अनेकांनी आपापल्या क्षेत्रात प्रस्थापितांविरुद्ध बंडखोरी केली व त्यासाठी आपले जीवन समर्पित केले एका ध्येयनिष्ठेसाठी ! पण आज प्रस्थापितांविरुद्ध बंडखोरी दिसत आहे ती पुष्कळशी सत्तास्थाने आणि प्रसिद्धी मिळविण्यासाठीची आहे.

### सर्वांना परिश्रमांचा कंटाळा

विद्यार्थीही प्रस्थापितांविरुद्ध दंड ठोकून उभे आहेत. त्यांना आता सर्व ठिकाणी हक्क हवे आहेत. शिक्षणात सुधारणा हवी, परीक्षात सुधारणा हवी, रहाण्यास उत्तम जागा हव्यात. या मागण्यांबद्दल कोणाचेही दुमत होणार नाही. पण हल्ली शिक्षण क्षेत्रांतील बंडखोरी केवळ भारतामध्ये नव्हे तर सर्व जगभर दिसत आहे, ती ज्ञान मिळविण्याबद्दलची नसून परिश्रमाविना पदवी कशी मिळविता येईल याबद्दलची आहे असे खेदाने म्हणावे लागते. आम्हांला ज्ञान मिळत नाही ते मिळण्याची व्यवस्था करा याबद्दल जर चालू पिढीचे विद्यार्थी प्रस्थापितांविरुद्ध बंड करतील तर मला खरोखर आनंद होईल. आजच्या विद्यार्थ्यांमध्ये असंतोष आहे व त्याला आजची वडीलधारी मंडळीही थोडी फार जबाबदार आहे. औद्योगिकरणामुळे आणि जीवनकलह तीव्र होत असल्यामुळे मोठी कुटुंबे आता एकत्र राहू शकत नाहीत. आजोबा आणि आजी ही संस्था नाहीशी होत चालली आहे. त्यांच्याकडून नवीन पिढीला मिळणारे संस्कार नाहीसे झाले. इतकेच नव्हे तर संसाराची दोनही टोके मिळविण्यासाठी पुष्कळदा पति–पत्नींना नोकरीही करावी लागते. अशा परिस्थितीमध्ये मुलांवर चांगले संस्कार होण्याऐवजी आजूबाजूच्या परिस्थितीचे परिणाम या नवीन पिढीवर त्यांच्या संस्कारक्षम काळात होतात. जुन्या व नव्या पिढीचे संबंध जवळकीचे रहात नाहीत. त्याचबरोबर विज्ञानामुळे होणारे नवनवे प्रश्न त्यांच्या समोर उभे रहातात व ते सोडविण्यास जुनी पिढीही समर्थ होत नाही. गेल्या पिढीसमोर काही आदर्श तरी होते पण सध्याच्या पिढीसमोर तेही नाहीत त्यामुळे त्यांच्यामध्ये एक प्रकारची विफलता निर्माण होत आहे आणि त्याचा परिणाम आज आपण "हिप्पी"सम तरुण वर्ग पाश्चात्य देशात पहातो तर आपल्याकडे त्याचे उद्रेक विश्वविद्यालय, शाळा वगैरे ठिकाणी दिसून येतात. जुनी पिढी आणि नवीन पिढी यामधील अंतर वाढत आहे ते कसे नाहीसे होऊ शकेल हे पहाणे समाजशास्त्रज्ञांचे आहे. एकत्र कुटुंब पद्धती सध्याच्या काळात इष्ट असली तरी अनेक कारणामुळे ती कितपत शक्य आहे हा प्रश्न आहे.






**बंडखोरीच्या भाषेमागील खरे उद्दिष्ट**

आजच्या तरुणांमध्ये काही बंडखोर खरोखरच तात्विक अधिष्ठान–ध्येयनिष्ठा धरून बंडखोर बनले आहेत पण असे फार अल्प आहेत. हे तरुण प्रस्थापितांविरुद्ध बंड करतात ते केवळ त्यांना कोणतीच ध्येयनिष्ठा नाही म्हणून; पण इतर बंडखोर आहेत ते केवळ चालू घडीची "फॅशन" म्हणून. स्वातंत्र्य कालापूर्वीपेक्षा आजच्या तरुणांपुढे अनेक कार्यक्षेत्रे खुली आहेत. पण त्याकडे दुर्लक्ष करून, गतानुगतिक असे बरेच तरुण, मेंढ्यांप्रमाणे नोकरीच्या, आणि तीही बैठ्या जीवनाच्या, पांढरपेशावृत्तीची दृष्टी ठेवून ! पण मनासारखी नोकरी मिळाली नाही की मग हे असंतुष्ट तरुण प्रस्थापितांविरुद्ध बंडखोरीच्या भाषा बोलतात. खरे म्हणजे प्रस्थापित चाकोरीबाहेर पहाण्याचीसुद्धा ज्यांना दृष्टी नाही त्यांनी प्रस्थापितांविरुद्ध बंडाच्या भाषा बोलायच्या याचेच आश्चर्य वाटते. जीवनासाठी नवी क्षितिजे धुंडाळण्याची दृष्टी नसलेल्यांचे बंड मोडतोड करण्यापलिकडे काय करणार ? त्यांचे बंड विधायक असे काहीच करू शकणार नाही. केवळ जुन्याना हे स्थानावरून उडवू शकतील आणि ज्याविरुद्ध हे बंड करण्यास म्हणून उठले तेच काम ते पुढे चालू ठेवतील. आजच्या तरुणांच्या बंडखोरीला विचारांचे, तत्त्वाचे, ध्येयाचे आणि त्यागाचे अधिष्ठान किती आहे याचा प्रश्न आहे.

अनेक ठिकाणी, विशेषतः सामाजिक संस्थांमध्ये बऱ्याचशा प्रस्थापितांना आपली जबाबदारी उचलण्यास तरुण पिढीतील कार्यकर्त्यांची गरज आहे. सतत, त्यागपूर्वक आणि प्रसिद्धीपराङ्मुख काम करण्याची मनोवृत्ती युद्धपूर्व काळात फार दिसत होती; युद्धोत्तराच्या स्वातंत्र्य काळात या वृत्तीचा लोप झाला. त्यागाचे मोल कोणत्या ना कोणत्या रूपाने मिळविण्याचे सूक्तानुसूक्त प्रकार सुरू झाले. कोणतेही स्थान मिळविण्यास पूर्वतयारी लागते यापेक्षा हात उभे करणारे लोक हाताशी असले म्हणजे झाले. ही झाली आजची प्रवृत्ति. लौकर पुढारी होण्याची ईर्षा व त्या ईर्षेच्या आड "आम्ही काही करू म्हटले। म्हातारे हे आड आले।।" ही भावना. पण त्यांच्या आड कोणी येत नाही. त्यानी स्वतः अग्रेसर होऊन कोणतेही काम हाती घ्यावे आणि धडाडीने सुरुवात करावी, तथाकथित प्रस्थापित त्यांना आनंदाने मार्गदर्शन करतील इतकेच नव्हे, तर त्यांचा मार्ग सुकर होण्यासाठी स्वतःच्या जागाही खाली करून देतील. पण संस्थेसाठी काही त्याग न करता, झीज न सोसता केवळ खुर्चीच्याच लोभाने, सत्ता आणि स्वार्थ यासाठी कोणी प्रस्थापितांविरुद्ध बंडखोरी करीत असेल तर अशा संस्था आपल्या जीवनाचे कार्य समजले असेल अशा प्रस्थापितांनी आपल्या मुलाप्रमाणे या बंडखोरांविरुद्ध संरक्षिल्या पाहिजेत. तेथे समेट म्हणून नमणे योग्य होणार नाही. पुष्कळदा असा समेट घातक होतो. कोणताही पिता योग्य काळी आपली कन्या योग्य वरास देतो तसेच प्रस्थापितसुद्धा योग्य कार्यकर्त्यास आपली संस्था आनंदाने हाती देतील. कारण या संस्था सतत चालावयाच्या असतात आणि तथाकथित प्रस्थापित हे काही या जगाचे कायमचे रहिवासी नाहीत. सतत, तेवढ्याच जोमाने कोणत्याही कार्यामध्ये कार्य करणे सर्वांनाच शक्य नसते. आणि म्हणूनच वानप्रस्थ आणि संन्यास याची योजना आपल्या समाजजीवनामध्ये केली गेली होती. आपण होऊन निवृत्त होण्याची जाणीव सर्वांनाच असते असे नाही. नोकरीमध्ये सक्तीची निवृत्ती आहे. व्यवसायामध्ये हा निवृत्ती काल बराच उशीरा येतो, पण संस्थांतील पदाधिकाऱ्यांमध्ये आपला निवृत्ती काल केव्हा असावा हे त्या त्या व्यक्तीने आपल्या कार्यशक्तीप्रमाणे ठरविणे जितके इष्ट आहे तितकेच त्याच्या सहकाऱ्यांनीही सुचविणे योग्य; पण पुष्कळदा दुसऱ्यांना आपण नको असताही केवळ सत्तेच्या लोभाने खुर्चीला चिकटण्याच्या वृत्तीमुळेच प्रस्थापितांविरुद्ध बंडखोरी येते. निवृत्तीची प्रवृत्ती मुळापासून बाणल्यास असा प्रसंग येणार नाही. पण निवृत्ती याचा अर्थ सत्तात्याग, कर्मत्याग नव्हे; कोणीही कर्मत्याग करू शकत नाही. त्या कर्मापासून मिळणाऱ्या फलाचा त्याग करू शकतो.

निवृत्तीचा खरा हेतू फलत्याग हे लक्षात ठेवल्यावर प्रस्थापितांनी निवृत्तीनंतर हाती घेतलेले कोणतेही कार्य सोडावे असे नाही. कलावंतांनी कलानिर्मिती सोडावी

[पृष्ठ ५२ वर पहा]

## प्रस्थापितांविरुद्ध बंड !

**[जीवनाच्या सर्वच क्षेत्रांमध्ये आज प्रस्थापितांविरुद्ध ओरड सुरू आहे आणि बंडखोरांना संधी मिळावी म्हणून 'प्रस्थापितां'नी आता निवृत्त झाले पाहिजे अशी बंडखोरांची जोरदार मागणी आहे. या प्रकरणी दोन्ही बाजूंचे म्हणणे समजून देण्या-घेण्याच्या दृष्टीने हा नवा परिसंवाद आम्ही या जानेवारी महिन्यापासून सुरू केला आहे. राजकारण सोडून साहित्य, समाजजीवन, कला, शिक्षण इत्यादि क्षेत्रांतील नामवंत व्यक्तींनी या परिसंवादात भाग घेऊन आपापले विचार वाचकांपुढे मांडावे असे आम्ही विचारवंतांना आवाहन केले आहे. त्यांच्याकडून येणारे साहित्य 'दीपावली'त क्रमशः येणारच आहे. वाचकांपैकीही कोणाला आपले या विषयावरील विचार व्यक्त करावयाचे असतील तर ते त्यांनी सुमारे १००० ते १२०० शब्दसंख्येच्या मर्यादेत अवश्य पाठवावे. प्रसिद्धीयोग्य वाटल्यास या परिसंवादात त्यांचा समावेश करण्यात येईल–संपादक]**

# जिणे न माझे केविलवाणे

—प्रभाकर अत्रे



**चंदेरी स्वप्ने आणि आघात (ही)**

डॉ. बंट माझ्या प्रकृतीसंबंधी बोलत होते. ते म्हणाले, "तुझ्यासारख्या मुलींचं कसं असतं सांगू? एकाच वेळी त्यांना आपण सामान्य आहोत, असावसंही वाटतं आणि त्याच वेळी आपण वेगळे आहोत असंही वाटतं. अडचण येते ती नेमकी तेथेच! दोन्ही साधत नाही. वैताग पदरी येतो."

त्यांच्यावर माझी श्रद्धा होती. झोपेच्या गोळ्या आणि मद्य घेणं मी सोडून दिलं होतं. आणि माझी प्रकृती खूप सुधारली आहे असंच मीही डॉक्टरांप्रमाणे मानायला लागले होते. माझ्या मनातल्या कटु स्मृती मी खणून काढण्याचा प्रयत्न करीत होते.

मला आठवतं – तेव्हा मी १२ वर्षाची असेन. माझ्याबरोबर काही मित्रमैत्रिणींचा घोळका असायचा. त्यात "बॉन्सी" नावाचा अतिशय लठ्ठ व बेरूप असा मुलगा होता. एकदा आम्ही खेळ खेळत होतो–पोस्ट–ऑफिसचा खेळ. त्याने मला स्पेशल डिलिव्हरी घेण्यासाठी बोलावले. स्पेशल डिलिव्हरी म्हणजे ओष्ट चुंबन! मला तो आवडत नव्हता. त्याने बळजबरीने ते चुंबन घेण्याचा प्रयत्न केला. मी त्याच्या श्रीमुखात भडकावली आणि बऱ्याच शिव्या दिल्या. तोही भडकला. आम्ही त्या खोलीतून बाहेर पडलो. मुले हसत होती.

मी रात्रीचे जेवण घेत होते. तेवढ्यात मला सिडने नावाच्या एका वर्गमित्राचा फोन आला. "काय झालं ठाऊक आहे? बॉन्सी वारला".

बॉन्सी ट्रॅक्टरखाली चिरडला गेला होता. फोन तसाच ठेवून मी उठले. माझं वागणं मला आठवलं. मी टेबलाशी गेले. सपाटून जेवले.

तेवढ्यात मला आईने विचारले, "कोण ग तो?" आणि मी ओक्साबोक्सी रडू लागले. कित्येक तास मी रडतच राहिले. शेवटी डॉक्टरांनी मला गोळ्या दिल्या. मी शांत झाले.

माझ्या साऱ्याच मित्रांना तसा धक्का बसला होता. पण कुणीही असा शोक केला नव्हता. मला तो आवडत नव्हता तरीही मी मात्र–

बॉन्सीच्या प्रेतयात्रेलाही मी गेले. तेथे त्याच्या शवपेटीवर मी असंच स्वतःला झोकून दिलं. मला ओढून बाहेर काढण्यात आलं.

"आपल्या भांडणामुळे त्याला मृत्यू आला ह्याबद्दलच्या खंती-मुळे तू अशी वागलीस" असं डॉ. बंट म्हणाले. ते अर्धसत्य आहे. त्या वयातही माणसांनी सुखी असावं. त्यांना जे जे हवं ते ते मिळावं असं मला वाटत होतं. बॉन्सीला जगापासून काही मिळालं नव्हतं. आणि आता तर मृत्यूने सारे संपवले होते.

"मग मी त्याला चुंबन कां घेऊ दिले नाही"? असं तुम्ही म्हणाल! मला त्याचा दांडगेपणा आवडला नाही. सक्ती पटली नाही. त्याने शांतपणे, सभ्यपणे चुंबन मागितले असते तर – तर मी दिले असते."

डॉ. बंटनी त्यावर विश्वास ठेवला.

तुम्हीही ठेवाल.










अनुक्रमणिका

....हॉलीवुडच्या जिल्ह्यात चित्रतारका बार्बारा पेटन हिच्या अद्भुत नि चित्तथरारक आत्मकथेचा हा तिसरा भाग! 'आम्ही समाजासाठी काही करतो का?' या विषयावर एका प्रख्यात चित्र-अभिनेत्याशीं झालेल्या चर्चेने ती भारावून गेली—पण प्रत्यक्षात ती कशी वागली?

ब्रॉन्सी व त्याचा तो अपघाती मृत्यू कितीतरी वर्षं माझ्या मनात घर करून होता.

ग्रेगरी पेकबरोबर मला महत्त्वाची भूमिका देण्यात आली होती "ओन्ली द व्हॅलिअंट" मध्ये! वृत्तपत्रातून ती भूमिका गाजली. यश – कीर्ती – पैसा – सन्मान – सत्कार – चढती श्रेणी! होय, मीच ती! श्रेष्ठ चित्रतारका. श्रेष्ठ नटांची हिरॉइन – ते दृश्यही समोर दिसतं. आणि आजचंही हे चित्र!

कधी कधी विचार येतो – कां? असं कां? कसे घडलं? मला वाईट वाटत नाही. लाजही वाटत नाही. जिथे – जसे जायचं होतं तशीच मी गेले. पण स्मृती! लक्षावधी रुपये मी मिळवीत होते. चित्रपटातून कामे करीत होते. एका मोठ्या नटाने एका रात्रीच्या शय्यासोबतीसाठी मला 'कॅडिलॅक' गाडी दिली. पुन्हा तो आला तेव्हा मी म्हणाले, "आज काय देणार आहेस?"

त्याला धक्काच बसला. तो निघून गेला. मी पुन्हा त्याच्याशी कधी बोलले नाही.

खूप स्मरतंय्. पण वेदना ठुसठुसतात. रक्तबंबाळ करतात.

ग्रेगरी पेकबरोबर मी काम करीत होते. पेक हा मोठा नट, कष्टाळू वृत्तीचा; पण कां कुणास ठाऊक माझ्यासमोर त्याच्या कामात रंग भरत नव्हता – शेवटी धूर्तपणे मला सांगण्यात आलं, "तुझं जेव्हा काम नसेल ना, तेव्हा तू सटवर येत जाऊ नकोस. तुझं अस्तित्व ग्रेगरीला अस्वस्थ करून जातं."

मी मनावरच घेतलं नाही. शेवटी मला माझ्याच चित्राच्या सेटवर जायची बंदी करण्यात आली. हॉलिवुडच्या इतिहासात हे प्रथमच घडत होतं.

त्याचा माझ्या मनाला फार धक्का बसला. मी तासन्तास डॉक्टर बंट यांच्याकडे बसून राहू लागले.

माणसाचा स्वभाव मोठा विचित्र आहे हेच खरं. जेव्हा सारं काही सुरळीत चालू असतं तेव्हा आपल्याला वाटतं, की कोणत्याही क्षणी काही तरी घडावं आणि हे सारं उध्वस्त होऊन जावं. पण जेव्हा असं काही घडतं तेव्हा मात्र आपल्याला ह्यातून कधी काळी आपली सुटका होईल असं वाटत नाही. समस्या आणि संकटं ह्या दोन्ही गोष्टी सुखाइतक्याच सहज येणाऱ्या आहेत. पण बदल हवा असतो हेच खरं. आज मी दुःखात असेन. उद्या उद्या उगवेल. नवी आशा उधळीत येईल, कधी तरी असलं दुःख वाटयाला येईल असं वाटलं होतं का? मी मागे वळून पाहते. विचार करते.

आणि मग मला ते सारं आठवतं.

वयाच्या सतराव्या वर्षी मी प्रथम हॉलिवुडला आले होते. कॅप्टन पेटनबरोबर माझे लग्न झाले होते. आम्ही हनीमूनलाच आलो होतो. त्याचे माझ्यावर उत्कट प्रेम होते. तो उमदा होता.

हॉलिवूड मला फार आवडलं. एखाद्या जवाहिऱ्याच्या दुकानात सोडून द्यावं आणि 'तुला हवा तो दागिना उचल' म्हणून सांगावं तसं ते मला वाटलं. 'ह्या नगरीतच माझं दैव घडणार आहे' अशी माझी मनोमन भावना झाली. त्या नगरीने मला भारून टाकले. माझ्यावर जादू केली. वाटलं, 'एका चित्रात मला काम मिळालं तरी बस्स! मग मी मरणसुद्धा पत्करीन.'

नवरा अस्वस्थ होत होता. मी मनाची सारी अस्वस्थता मद्याच्या चषकात बुडवून टाकण्याचा प्रयत्न करीत होते. त्याच्याबरोबर मला परतायचे नव्हते. त्याला मी निघून जायला सांगितले. तो गेला. मी त्यावेळी निकरबॉकर हॉटेलात रहात होते. स्वप्न मात्र रुपेरी दुनियेची पहात होते. एक दिवस तिथला लिफ्टमन बॉबी मला म्हणाला 'आर् के ओ चा पाच संयोजक दिग्दर्शक ग्रिफिथ ह्याच हॉटेलात उतरला आहे.'

ती बातमी मला मोलाची वाटली; पण त्याला भेटून आपली इच्छा कळवण्याचा धीर मात्र मला झाला नाही. पण दैव दयाळू होते. एक दिवस ग्रिफिथ मला लिफ्टपाशी भेटले. त्यांनी आपण होऊन माझी चौकशी केली व मला आपल्या कार्यालयात बोलावून घेतले. माझी चाचणी घेण्याचे ठरले. संवादाची चाचणी झाली. मग कॅमेरा चाचणी!

आणि तरीही सांगण्यात येतच होतेः 'फार आशावादी राहू नका. चाचणी घेतलेल्या दहापैकी एकाला संधी मिळते.'

मी आकाशात तरंगत होते.

लिफ्टमन बॉबीसाठी मी एक सिगरेट पाकीट घेतले. त्याला लाल रिबन लावली व त्याला ते भेट म्हणून दिले. पाकीट आणि चुंबनही!

रोज सकाळी मी स्टुडियोत जात होते. तिथल्या साऱ्याच गोष्टींवर माझे प्रेम बसले होते. पण कां कुणास ठाऊक—

दररोज सकाळी मला अगदी गळून गेल्यासारखे वाटे.

'भीती!' सारे जग म्हणत. "पण भीती जाईल" तेच धीर देत.

पण मी कॅमेऱ्यापुढे उभी राहिले. सीन अर्धामुर्धा झाला असेल नसेल, मला एकदम अस्वस्थता वाटू लागली. मला चक्कर आली.

डायरेक्टर म्हणत होते 'होतं असं पहिल्या पहिल्यांदा.'

पाणी प्यायले. पुन्हा शूटिंगला सुरुवात झाली. आणि मी एकदम कोसळलेच!

नर्स धावत आली. तिने स्मेलिंग सॉल्टची बाटली नाकापुढे धरली. शुद्धीवर आल्यावर आमचे बोलणे झाले.

निष्कर्ष एकच होता–मी गरोदर होते!! मी खूप रडले, आकांत केला. पण ते सत्य होते. न बदलणारे सत्य!! डॉक्टरने तेच सांगितले व माझे अभिनंदन केले. मी मात्र तोंड हातात लपवून









**छेकापन्हुती . . .**

'स्वरा' मनापासून करायचा
पण 'नस्वरा' म्हणायचं छे !
खदखदून हसवणारी 'कळा'
पण 'नकळा' म्हणायचं छे !
प्रत्यक्षात ज्याला 'वश'यचं
पण 'नवरा' म्हणायचं छे !

— म. बा.

खूप खूप रडले. मी ग्रिफिथ यांच्याकडे गेले. माझे डोळे पाण्यान भरले होते. ग्रिफिथने फारच उत्तम वागणूक दिली. वास्तविक मी त्याचा वेळ, पैसा प्रयत्नांवर पाणी ओतले होते.

"आई हो. आणि वर्षभराने सारं काही ठीक असलं, आणि ह्या व्यवसायाची ओढ असली तर परत ये. तुझ्यामध्ये एक श्रेष्ठ अभिनेत्री वसत आहे असं मला वाटतं."

एक वर्ष ! कुणास ठाऊक ! कदाचित अधिकही ! मला ती शिक्षा वाटली–जणू मृत्युदंडच ! मला वाटलं मरून जावं. माझ्या नवऱ्याला मी भरपूर दोष दिला.

परतताना अनेक दुष्ट विचार मनात येऊन गेले–आत्महत्त्येचासुद्धा विचार मनात आला. पण गर्भपाताचा मात्र नाही. मला मुलाचा विचार सतावीत होता. माझ्या आशांवरच जणु त्याने निखारे ठेवले होते. पण तरीही मी आई होणार आहे ह्या कल्पनेने मला अमाप आनंद झाला. आज तर मला वाटते की, मी योग्य तो निर्णय घेतला.

माझ्या मुलावर मी असीम प्रेम केलंय्, करते. 'मी अजून जिवंत का ?' ह्या प्रश्नाच्या उत्तरात त्याचा वाटा फार मोठा आहे. फार फार मोठा आहे.

**जे पेराल, तेच उगवेल !!**

मला तर कधी कधी वाटतं ही एखादी खूप मोठी अशी रहस्यकथाच असावी. माझ्या आयुष्याची अशी वाताहत कां झाली ? कां ? ती खरंच टाळता आली असती ? कशी टाळता आली असती ? निदान काही प्रमाणात तरी टाळता आली असती ?

पण आधी मी शिखरावर पोहोचले कशी ? श्रेष्ठ अभिनेत्री, गुणी चित्रतारका मी मुळी बनलेच कशी ? शून्यातूनही परार्धं मी मुळी पाहिलीच कशी ? थांबणे, वाट पाहणे, आशांची स्वप्ने पहात झुरणे–झगडणे आणि मग कुठल्या तरी एखाद्या सुवर्णक्षणी ती स्वप्ने सत्याचा आकार घेऊन पुढे आलेली पाहणे–हा आणि असाच क्रम ! त्या सुवर्णक्षणांचा स्पर्श झाल्याशिवाय काही खरं नाही ! अन्य गती नाही.

तसा तो स्पर्श मला १९४९ साली लाभला. मी माझ्या एका मैत्रिणीकडे तेव्हा रहात होते. तिच्याकडे बरेच मित्र येत. एकदा मी स्नानगृहात होते–तेवढ्यात तिचे एक मित्र आले. तिने स्नानगृहाचा पडदा ओढल्यासारखं केलं. म्हणाली 'मि. गॉर्डन आले आहेत.' गॉर्डन हे बँकर होते. ते चित्रनिर्मात्यांना द्रव्य उपलब्ध करून देत असत.

त्या दिवशी त्यांनी मला पडद्यातून ओझरतं पाहिलं असावं. कारण नंतर आम्ही भेटलो तेव्हा ते मला म्हणाले "खरं सांगू का ? त्या पडद्यातून मी जे पाह्यलं त्याचं चित्र माझ्या मनावर अजून जसंच्या तसं कोरलेलं आहे."

तो मोठा मजेशीर माणूस होता. त्याने मला चित्रपटात कामे मिळवून दिली; पण त्याने कधी शरीरसुखाची अपेक्षा व्यक्त केली नाही. त्याला माझी मैत्री हवी होती. आणि एक चित्रतारका आपली मैत्रिण आहे यावर तो खूष होता. तो मला नेहमी 'परी' म्हणूनच संबोधायचा. मी त्याला स्नानगृहात अर्धावृत्त स्वरूपात जर दिसले नसते व तसं मी दिसावं अशी माझ्या मैत्रिणीने जर सोय करून दिली नसती तर—

—तर कदाचित तो सुवर्णक्षण आलाही नसता.

ह्या चंदेरी, रुपेरी जगतात काहीही, कसंही–कधीही घडू शकतं हेच खरं. पुष्कळदा घटना अशा एकामागून एक अशा क्रमाने घडतात. त्या योगायोगातून तुमचे जीवन घडत जाते, आकारत जाते. त्या योगायोगांना जीवनात फार महत्त्वाचे स्थान असते आणि त्या साखळीतला प्रत्येक दुवा तसा महत्त्वाचाच असतो.

मि. गॉर्डनच्या कृपेने मी एका चित्रपटात काम करीत होते. डेनिस मॉर्गन व जॅक कार्सनबरोबर मी भूमिका करीत होते. आमचं आऊटडोअर शूटिंग ज्या ठिकाणी चालायचं त्या ठिकाणी कारंजापाशी एक मुलगा नेहमी उभा रहायचा. मुकाट्याने सारे काही पहात. कुणी त्याच्याशी बोलत नसे व तोही फारसा कुणाशी बोलत नसे. त्याच्याबद्दल मला फार कीव वाटे.

एकदा मी काहीतरी निमित्त करून त्याच्याशी बोलले. आणि मग आम्ही एकमेकांशी बोलू लागलो. तो दिग्दर्शकाचा मुलगा होता हे मला नंतर समजलं. मग तो मला पडद्यामागच्या बऱ्याच गोष्टी ऐकवीत असे. एकदा मी त्याला घरी पोहचवायला गेले तेव्हा तो म्हणाला "या ना, आत या" मी गेले. ते घर अनेकविध व सुंदरशा शिल्पाकृतींनी सजवलेले होते.

आम्ही बोलत बसलो होतो, तेवढ्यात त्या मुलाचे वडील आत आले. पण त्यांनी मला ओळखले नाही. कसे ओळखणार ! मला एक नगण्य भूमिका मिळाली होती. आत येता येता ते चित्रपटातल्या नायिकेला शिव्या मोजीत होते आणि मद्य झोकीत होते.

मध्येच त्यांना कसला तरी झटका आला आणि ते म्हणाले "चार्ली चॅपलीनची भूमिका करायला काही कुणी चार्लीला बोलावणार नाही. प्रेक्षकांना हवे असते अतिरंजन, उदात्तीकरण किंवा वस्तुस्थितीचे विकृतीकरण सुद्धा हवे असते. त्यातून ते सत्याच्या जवळ जात असतात. चित्रपटात हेच हवं असतं. लेखकं व्यक्तीरेखा रंगव-








तात. आम्ही त्यात जीव भरतो. मला काय म्हणायचं आहे ते आलं का लक्षात ? जरा ऊठ वरं. चालून दाखव."

"ह्या दिग्दर्शकांच्या खोडीच फार विचित्र ?" असं म्हणत मी उठून चालू लागले.

"सुंदर !"

"तुझं नाव काय ?"

"बार्बारा पेटन !"

"आता बार्बारा पेटन म्हणून जरा फेरफटका मार पाहू !"

मी तशीच चालू लागले; पण त्याला मात्र त्यात फरक जाणवला (असावा) "सुंदर ! ह्यात अधिक भर पडली बघ ! तू हुशार आहेस. तुझ्यात अंगभूत गुण आहेत. आता तू मला शय्यासोबत करशील, होय ना ?"

तो मुलगा मद्य पीत राह्यला. मी हसले आणि म्हणाले "ज्यांना तशी सोबत द्यावी असं मला वाटतं त्यांना मी ती देतेही. तुमचा माझा परिचयसुद्धा नाही."

त्याला त्याचीही गंमत वाटली. तो म्हणाला "म्हणजे आशेला जागा आहे तर ! चलाख आहेस."

दुसऱ्या दिवशी सेटवर त्यानं मला नीटशी ओळखही दिली नाही. पण मुलाबरोबर एक चिठी मात्र पाठवली "आज रात्री जेवायला येशील ?"

मुलाने मला एका हॉटेलात नऊन सोडले. तो निघून गेला. दिग्दर्शक तिथेच थांबलेला होता.

बोलता बोलता तो म्हणाला "खरं सांगू सिसी (तो मला सिसी म्हणत असे) तू खूप मोठी अभिनेत्री होणार आहेस. खूप मोठी ! आणि मग विनाशाच्या, अधःपाताच्या गर्तेत जाऊन पडणार आहेस."

त्याचं भविष्य खरं ठरलं आहे; पण तेव्हा मात्र ते पटण्यासारखं नव्हतं.

तो असं कां म्हणाला ते मी त्याला विचारलं. त्यानं मला हसत हसत सांगितलं की आता घरी जा. गरम पाण्यानं झकास आंघोळ कर. उद्या गार पाण्यानं कर. आणि सेटवर ये. मी तुला माझ्या नवीन चित्रपटाची कथा वाचायला देईन. त्या पटकथेत एका निष्पाप, ध्येयवादी अशा तरुणीची एक भूमिका आहे. लोक चांगले आहेत. ती चांगली आहे अशी तिची श्रद्धा असते खरं तर ती चांगली नसते. लोक चांगले असतात म्हणून काही काळ तिची चांगलेपणाची प्रतिमा कायम टिकते. चांगली, ध्येयवादी अशी तरुण मुलगी अखेर संपते आणि त्या राखेतून अखेर एक पशू, एक राक्षस उभा राहतो आणि तुला ती भूमिका योग्य आहे. चित्रतारका होण्याचा हाच एक मार्ग आहे. त्या मार्गावर तुझी लटलटती पावलं अशीच पडणार आहेत."

मी सेटवर गेले. त्यांनी मला एक पटकथा दिली. मी मोठ्या उत्सुकतेने ती वाचली; मला खूप वाईट वाटलं. माझी निराशा झाली. त्यात माझ्याजोगती भूमिकाच नव्हती.

दुसऱ्या दिवशी मी सेटवर गेले. त्याला विचारलं "यातून तुम्ही काय साधणार आहात ? कशाला असं खोटं बोललात ?" आणि माझे डोळे पाण्याने भरून आले.

त्याने हसत विचारले "कशी काय वाटली कथा ?" माझ्या अश्रूंचा जणु त्याच्यावर काहीच परिणाम झाला नव्हता.

"भयानक !"

"माझंही तेच मत होतं; पण मला कुणी प्रामाणिक मत देत नव्हतं. तुला त्यात सुयोग्य भूमिका आहे असं सांगितलं की तू शब्द न् शब्द वाचशील अशी माझी खात्री होती."

"चक्रमच आहेस" मी त्याला म्हणाले.

तो मोठ्याने हसला आणि आपल्या कामाला निघून गेला. माझे डोळे पाझरू लागले. त्याच्या मुलाने ते पाहिले. माझे सांत्वन करीत तो म्हणाला "त्यांचं वागणं जरा विचित्रपणाचं असतं खरं. पण ते शब्दाचे सच्चे आहेत. तू जरा धीर धर."

मी मन घट्ट केलं, थांबले.

दुसऱ्याच दिवशी सकाळी माझ्याकडे एक माणूस आला. त्याने एक पटकथा व चिठ्ठी हाती दिली. चिठीत लिहिलं होतं. "ह्यातल्या फरेडाच्या भूमिकेचा विचार करून ठेव."

मी ती पटकथा वाचली. मला ती फार फार आवडली. माझी चाचणीही न घेता ती भूमिका मला देण्यात आली. जिमी कॅग्ने प्रॉडक्शनशी माझा करार झाला.

योगायोग !

कारंजापाशी उभं राहून शांतपणे सारं काही पाहणाऱ्या त्या मुलाशी मी मुळी बोललेच नसते तर—

तर हा योग साधला असता का ?

मला एक फार मोठा नट एका पार्टीच्या वेळी भेटला. फ्रँकॉट टोन भेटण्यापूर्वीची ही गोष्ट. मोठा अभिनेता म्हटलं की त्याच्या चेहऱ्याकडे पहात रहावं असं तर वाटायचं, पण एकीकडे खूप खूप भीतीही वाटायची. त्या मोठ्या नटाला आपण तूर्त जोसेफ म्हणून संबोधूया. तो देखणा होता. विवाहित होता पण त्याची पत्नी न्यूयॉर्क वा त्याच्या उपनगरात रहात होती. त्याचं घर होतं ब्रेंटवुडमध्ये. मला जोसेफ भेटला तेव्हा त्याच्या पत्नीची व त्याची चार महिन्यात भेट नव्हती.




**"मी म्हणते इतर इतक्या धंद्यामध्यें तुम्ही पैसे गुंतवले आहेत. तसे थोडे समाजवादामध्येही गुंतवले तर काय झालं ?"**







अनुक्रमणिका

माझं नाव ऐकताच अनेकदा ते नाव घेत त्याने काही तरी आठवण्याचा प्रयत्न केला–आणि मग गेल्या सप्ताहात त्याने मला कसे, कुठे पाह्यले ह्याचा तपशील अचूक सांगितला. माझ्या शारीरिक खाणाखुणाही अचूक सांगितल्या. त्या सांगून तो म्हणाला "बरोबर ?"

"अगदी बरोबर ! शेरलॉक होम्सच जणु !"

माझ्या ह्या अभिप्रायावर तो एखाद्या लहान मुलासारखा लाजला आणि कौतुकाने हसलाही.

"आज रात्री आपण चेसन हॉटेलात खान्याला जाऊ या" तो म्हणाला. आम्ही गेलो. त्यानंतर आम्ही अनेक वेळा व अनेक ठिकाणी गेलो. एकमेकांच्या सहवासात काही दिवसही घालवले. एकदा आमचा वाद झाला. विषय होता आमचे समाजातले स्थान काय हा ! "आम्ही समाजासाठी काही करतो का ?" हा !

एके दिवशी पहाटे तीन वाजताच तो मला म्हणाला "चल-तुला काही गोष्टी दाखवतो."

आम्ही एका लाकडी घरासमोर जाऊन उभे राह्यलो. त्याने बेल वाजवली. एक धिप्पाड चायनामन बाहेर आला. "या ना. आत या" तो त्याला पाहताच म्हणाला. "नको, फक्त मला काही प्रश्नांची उत्तरं हवी आहेत. ह्या घराचं भाडं कोण भरतं ?"

"आपणच भरता. भाडे, खाण्यापिण्याचा खर्चही आपणच करता की !" आणि मग माझ्याकडे वळून पहात तो म्हणाला "मोठा झकास माणूस आहे हा !"

"मला बदल्यात काय मिळतं ?"

"तृप्तीचं स्मित !"

"बघ !" असं म्हणत, जोसेफ माझ्याकडे पाहून हसला. त्याची मुद्रा अभिमानाने फुलली होती.

आणखीही काही ठिकाणी त्याने मला नेले. त्याच प्रश्नोत्तरांची पुनरावृत्ती झाली. मग जोसेफने एक वही काढली व आपण ज्यांना आर्थिक साहाय्य देतो अशा काही कुटुंबीयांची यादी मला दाखवली.

जोसेफच्या जगण्याला काही अर्थ होता. काही हेतू होता. त्याच्या हातून घडणाऱ्या गोष्टींबद्दल त्याला सार्थ अभिमान होता.

मला जोसेफचा स्वभाव आवडला. तो साधा होता. उदार होता, सहृदय होता. तो मद्य फार घेत असे. पण चंदेरी दुनियेत ती गोष्ट खपूनच जात होती. मी कितीतरी आठवडे त्याच्याकडे राह्यले.

एकदा तो मला म्हणाला "आपण जे पेरतो ते उगवते ह्या म्हणीवर माझी श्रद्धा आहे. त्यामुळे मला मार्ग दिसतो आणि त्या मार्गाने जाण्याची रीतही गवसते."

आम्ही एकमेकांशी खूप चांगुलपणाने वागलो. नंतर आमचे मार्ग भिन्न झाले.

सहा महिन्यांनंतर मी भेटले तेव्हा त्याच्या गाडीखाली एका म्हाताऱ्या जोडप्याची हत्या झाली होती. तो तर्र झालेला होता. पण त्या जोडप्याला वृद्धत्वामुळे कमी दिसत असल्यान हा अपघात घडला असा बचाव करण्याचा प्रयत्न होत होता. हा बचाव लंगडा होता हे साऱ्यांना ठाऊक होते; पण जोसेफचे लागेबांधे खूप होते. मी गेले तेव्हा तो आढ्याकडे पहात पडला होता. मी त्याचे सांत्वन केले तेव्हा तो थंडपणे म्हणाला, "जे पेराल, तेच उगवेल."

त्याचे दुःख आपले जीवन उध्वस्त होईल वा आपल्या जीवनाला कलंक लागला म्हणून नव्हते तर आपल्या हातून दोन जीवांची हत्या झाली ह्याबद्दलचे होते. त्याच्या त्या मनःस्थितीत तो काही अतिरेकी कृत्य करील अशी मला भीती वाटली आणि 'मी सोबतीला राहते' असं म्हणाले. पण त्याला एकट्यानेच रहायचे होते.

खटल्याचा निर्णय लागला. तो सुटला. त्या जोडप्याच्या वारसांना पैसे देण्यात आले. पण त्यानंतर जोसेफचे सारे काही बिघडलेच. मद्य आणि मदिराक्षी यांचा तुफान उपभोग घेताना जणु 'उद्या' नाहीच अशा विचाराने तो वागत होता. अशाच एका मदिराक्षीच्या मिठीतच हृदयविकाराने त्याला मृत्यू आला.

त्याच्या जीवनाचा आणि त्याच्या मृत्यूचा माझ्या मनावर फारच खोल असा ठसा उमटला आहे. चांगलं वागण्याची व चांगलं असण्याची सक्ती जणु त्याने स्वतःवर लादून घेतली होती. दैव मात्र वेगळाच खेळ खेळत गेलं होतं. त्यानंतर जसं वाटलं तसं मी करत गेले. वागत गेले. उगाच भलत्या योजना आखीत बसले नाही. त्याची स्मृती सतत कायम आहे. जोसेफवर मी खरोखरच प्रेम केलं.

[ क्रमशः ]








## जीवन ही एक सैर आहे

शरीर हे काय आहे, याचा विचार कधी करायचा नसतो असे प्रतिपादन करणारे संख्येने 'खूपच' आढळतात. आणि त्याचा विचार केल्याशिवाय जगू नये असे जीव तोडून सांगणारे सुद्धा काही कमी नाहीत या जगात ! तर हा 'विचार करा' असं आवर्जून सांगणारी ही कादंबरी.

खरं तर शरीराची तमा बाळगून जगणारे लोकच अधिक स्वैर असतात. कारण त्यांची कळत नकळत प्रतिक्रिया अशी की–मृत्युनंतर कदाचित् आत्मा भेटू शकेल, पण शरीराचा दुसऱ्या शरीराशी मिलाफ होत नाही. पण हे तत्त्वज्ञान–म्हणून शरीराचा मोह कुणी आवरला असे होत नाही. प्रभाकर अत्रे यांनी चित्रित केलेला अनिरुद्ध हा शरीराचा 'भोक्ता' आहे आणि त्याहीपेक्षा त्या देहामध्ये व्यग्र असणाऱ्या मनाचा भक्त आहे–यासाठीच तर तो स्वतः समर्पित आहे. देहाची वर्णने करण्यापेक्षा तो अनिरुद्ध होऊन देह धुंडाळतो–आजच्या सभ्यतेच्या जगात जे जे, जिथे जिथे मिळते–तिथे जाऊन ! जाण्यात त्याच्या शिस्त आहे–व्यवसायाने तो फिरतीवर होता–आणि हाच त्याचा पिंड होता. तरी देखील त्याच्या व्यवसायात आणि उपभोगात गल्लत नाही. आत्यंतिक शिस्त नि आत्यंतिक प्रामाणिकपणा त्याच्याकडे आहे म्हणूनच तो जान्हवी–सुगंधा–माधवी या तिन्ही राधांसाठी मथुरा-द्वारका-वृन्दावन निर्मू शकतो. प्रत्येकीचे स्वतंत्र स्थान आणि प्रत्येकीच्या मनात त्याचे स्वतंत्र स्थान !

'शरीर' कथेची ही आहे सरळशी भूमिका ! पण ही भूमिका आजच्या ग्लॅमर जगात सरळ सांगून टाकणे हेच कष्टाचे काम असते. त्यातून मन व्यक्त करणे हे सोपे नव्हेच नव्हे ! तरीही हा मार्ग सोपा करण्याचे धाडस अत्रे यांनी दाखविले आहे. आडपडदा जसा अनिरुद्धाच्या जीवनात नाही तसा लेखनातही नाही. यासाठीच हे शरीर नुसता स्पर्श फुलवीत नाही–तर एक स्पर्शभाषा एक सुलतानाच्या फर्मानासारखी अंमल बजावते.




लेखकाने जे सांगितले त्यात अनिरुद्ध हा वाचेने-वृत्तीने स्पष्ट आहे.

तो म्हणतो–'चांगली नोकरी लागली आणि पहिली गोष्ट कोणती केली असेल तर ती म्हणजे लग्न. मी फिरतीवर म्हणून आईला हवी होती सोबत. मला हवा होता फिरतीनंतरचा विरंगुळा–' आणि याच स्पष्टतेने तो सबंध कथा आपल्या भोवती घुमवीत ठेवतो. त्या घुमण्यामध्ये देहाचे माध्यम आहे–चौपदरी माध्यम. जान्हवी–सुगंधा–माधवी–अनिरुद्ध !

यांचा आविष्कार म्हणजे काही वासना भडकविण्याचा आधुनिक प्रकार नव्हे. लेखकाच्या पिंडाची ही तऱ्हा नव्हेच. तशी ती नाही. तरीही व्यवसायाच्या भिन्नतेत मनाची अतृप्ती एकवटू लागली म्हणजे जे होते–ते विलक्षण जीवन म्हणजेच हे अनिरुद्ध जीवन आहे.

त्याच्या भाषेनेच ते अधिक नटते–

'जीवन ही सैर आहे' इथून ते थेट 'डबक्यातलं जीवन जगू नका' इथपर्यंत ऐकीव वचने कुणीही बरळतो. अनिरुद्ध या वाटेला जात नाही. त्याला कळते वासना आणि विकार–म्हणूनच तो सातत्याने ही भूक भागवितो.

पण यातील अभिजात तंतू लेखकाने पकडलेला दिसतो. कथा शरीराची, पण ती वर्णन करताना मनाचे उठणारे स्फुल्लिंग मात्र त्यात गुंफायचे–हे साधले आहे. नाही तर इतका भोगी कदाचित् चित्रलेखेचा अतृप्त कुमारयोगी झाला असता. किंवा सौ. जोगळेकरांची 'स्पर्श मोहिनी' झाली असती. पण ते होत नाही. उलट––

'चार चांगल्या वस्तू नुसत्या एकत्र ठेवल्या म्हणजे काही चांगला पदार्थ होत नाही, करणारे हात चांगले असावे लागतात.

"माझ्यातल्या सोज्वळ, सज्जन माणसाचा त्या मिठीत चुराडा झाला, उरला फक्त नर – दिवसभर भयाण तुफान अनुभवलं––

असं म्हणत, स्वतःचं प्रत्येक कृतीत आत्मपरीक्षण करणारा अनिरुद्धच सगळीकडे भेटतो.

लेखक हे बंध उलगडून दाखवतो तेव्हा प्रत्येक पदराखाली मानवी मनाची नवी बाजू उलगडलेली असते. एरव्ही मन दडपून जगणारे आणि 'गुत्यात जाऊन मोसंबीचा रस' पिण्याचा आव आणणारे अधिक भेटतात–हे पटते.

अत्रे–त्यांच्या कथेमध्ये रंगतात तेव्हा ती पात्रे बोलकी होतात असे नाही–निसर्गाचा दृष्टीआडचा भाग सुद्धा शब्द करू लागतो–

–"झोपडीत ड्रिंक्सची व्यवस्था केली होती. मी डोळे मिटले. कूस बदलली. झोपडीच्या भिंतीवर कुणी तरी देवीचे चित्र काढले होते. तिच्याकडे माझे वळता वळता लक्ष गेले–

हे बोल जेव्हा उमटतात तेव्हा शरीर धुंद झालेला सुद्धा खाडकन् जागेवर येतो आणि स्वतःलाच शोधू लागतो. जान्हवीचा शोध घेणारा, सुगंधाच्या देहाची ऊब लपेटून बसणारा आणि माधवीचा ध्यास सावरणारा अनिरुद्ध हा नर असला तरी प्रत्येक शरीराची जात नि घडण ओळखून त्याना प्रतिष्ठापन करण्यात गुंतलेला आढळतो.





अनुक्रमणिका

एक हलके फुलके चित्रण आहे हे, पटत नाही–इतके हळवे शरीर सांगून जाते. भोगवाद पटतो तेव्हा मन उरत नाही; पण मनाचा नि शरीराचा सहप्रवास दृश्यमान होतो तो केवळ शरीराच्या आविर्भावातच ! आणि हेच स्पष्ट करण्याचा एक जाणीवपूर्वक प्रयत्न लेखकाने केला आहे.

पुरुष आणि प्रकृतीचा हा खेळ आपल्या दृष्टीने आजच्या समाजाच्या पार्श्वभूमीवर रेखाटून लेखकाने 'वेगळे' दिल्याचा समाधान-ठेवा निश्चितच मिळविला आहे.

"आयुष्यात कधी तरी असंही घडतं तर–लेखकाची अशीच एखादी धुंदावणारी आविष्कार कथा शरीरामागोमाग यावी असे वाटते–प्रकर्षाने वाटते.

**––प्रेमानन्द मयेकर**

(**शरीर**–ले: प्रभाकर अत्रे. प्रकाशक गुलाबराव मारोतराव कार्ले. **नवमहाराष्ट्र प्रकाशन**; १९७५, सदाशिव पेठ, पुणे-३०. मूल्य तीन रुपये).

## विशुद्ध प्रेमभावनांची अभिव्यक्ती

'जीवन हे बुद्धिबळाच्या पटासारखं असतं' असं म्हणतात. माणसं ही त्या पटावरील केवळ प्यादी ! एका अज्ञात शक्तीचा अदृश्य हात ती प्यादी हलवीत असते. अप्रतिहतपणे. माणसाच्या मनाला, इच्छा-आकांक्षांना, स्वप्नांना, संकल्पांना तिथे क्वचितच स्थान असते. याचा विलक्षण विदारक प्रत्यय, निदान काहींना तरी आपल्या आयुष्यात येतो. श्री. चिंतामण शंकर जोशी यांची '**शतरंज**' ही दुसरी कादंबरी प्रामुख्याने याच विचाराभोवती गुंफली आहे असे स्थूलपणे म्हणता येईल. कादंबरीच्या प्रतिकात्मक अभिधानावरूनही हे सहज लक्षात येते.

असे असले तरी याहूनही अधिक काही सांगण्याचा, माणसांच्या अंतःप्रेरणांचा शोध घेण्याचा त्यांनी इथे निश्चितच प्रयत्न केला आहे व तोच अधिक श्रेयस्कर, स्वागतार्ह आहे.

ही कहाणी आहे अतृप्त, आर्त प्रेमिकांची आणि त्यांच्या उदात्त, सखोल, निःसीम, भव्यदिव्य प्रेमाची. अरविंद हा एक तरुण इंजिनीअर. लग्नानंतर त्याला समजतं की, आपल्या पत्नीचं–पुष्पाचं–पूर्वायुष्यात कॅप्टन अभय नावाच्या एका लष्करी अधिकाऱ्यावर प्रेम होतं. त्यांचे संबंध होते. तिचा गर्भपातही झाला होता. पन् तरीही अरविंद हा समंजस, संयत, मोठ्या मनाचा गृहस्थ झालं गेलं विसरून संसाराची नवी घडी सुस्थिर करण्याचा प्रयत्न करतो; परंतु पुष्पा मात्र त्याला प्रतिसाद देऊ शकत नाही. त्याच्या मते ती 'एक दुराग्रही, मग्रूर आणि हट्टी स्त्री' आहे. तिचं अभयवर इतकं प्रेम आहे की, जगात दुसऱ्या कुणावर प्रेम करण्याची दुसऱ्या कुणाची पात्रताच नाही असं ती मानते. इथेच त्यांच्या तथाकथित संसाराला तडा जातो, विसंवाद निर्माण होतो. पती-पत्नी असूनही त्या उभयतात कोणतंच नातं निर्माण होत नाही. एकाच छपराखाली राहणाऱ्या दोन व्यक्ती जणू दोन ध्रुवांहून दूर असतात. आणि याच वेळेला एक जोडपे तळमजल्यावर रहायला येते. त्यांच्याही आयुष्याचे फासे असेच उलटे पडलेले असतात. सुरेखाही सुंदर तरुणी अनेक अर्थांनी अतृप्त असते. कारण तिचा पती पुरुषोत्तम हा मध्येच आपलं पौरुषत्व गमावून बसलेला असतो. रेखा व अरविंद यांची लहानपणीची ओळख निघते–आणि मग हे दोन अतृप्त आत्मे अधिकाधिक जवळ येतात. प्रेमाचे धागे विणले जातात. क्षुधित असूनही दोघातील प्रेम मात्र निरागस, अशरीरी, platonic असतं. साहजिकच पुष्पाचा अहंकार दुखावला जातो. स्त्रीत्व डिवचलं जातं. असूया पेट घेते. अरविंदबरोबर भांडण करून ती माहेरी निघून जाते व तिथून त्याला एक मोठं थोरलं धमकीवजा पत्र लिहिते. अरविंदवर व्यभिचाराचा दावा करून त्याच्याकडून घटस्फोट मिळवण्यासाठी कोर्टात फिर्याद गुदरण्याचा तिचा मनोदय असतो. अरविंदही हे आव्हान स्वीकारून तिच्याशी कोर्टात दोन हात करायला तयार होतो. कारण त्याचं प्रेम व्यभिचारी नसतंच व ते त्याला सिद्ध करायचं असतं. मध्यंतरी पुरुषोत्तमही घरातून परागंदा होतो—पुन्हा परत न येण्याच्या इराद्याने. आणि रेखाला दिवस गेले असल्याचे डॉक्टर सांगतात. कारण पुरुषोत्तमला पुन्हा आपोआप पुरुषत्व प्राप्त झालेले असते. इथे अभय विमान अपघातात ठार झाल्याची बातमी आल्यामुळे पुष्पा आत्महत्येचा प्रयत्न करते व अखेर इस्पितळात मरण पावते. पुरुषोत्तमही मुंबईतल्या एका हॉटेलात नाव बदलून काही दिवस राहतो व नंतर झोपेच्या जास्त गोळ्या घेऊन आत्महत्या करतो. त्याला पहायला जातानाच रेखाच्या पोटात असह्य कळा येतात व तिला इस्पितळात न्यावे लागते. तिथे तिचा गर्भपात होऊन ती सुदैवाने वाचते. जणू तिचा पुनर्जन्म होतो. .अरविंदसाठी !

सत्य हे अनेकदा कल्पिताहूनही अद्‌भूत, चमत्कारिक असतं हे खरं; परंतु विवक्षित कथाविश्वातील घटना म्हणजे परिस्थितीची अथवा स्वभाववैशिष्टांची प्रायः अपरिहार्य परिणती असायला हवी निदान तशी पार्श्वभूमी लेखकाने निर्माण करायला हवी. अन्यथा त्या कलाकृतीतील घटना ह्या कृत्रिम, कपोलकल्पित वाटतात आणि पात्रं ही नियतीच्या हातातील कळसूत्री बाहुली वाटण्याऐवजी लेखकाच्याच हातातील बाहुली असल्याची विरस करणारी जाणीव होते. 'शतरंज'मधील काही घटनांच्या बाबतीत हे जाणवते.

अरविंद व सुरेखा या दोघांच्या दोन आत्मनिवेदनातून ही कादंबरी आकार घेते. तेव्हां या दोन्ही आत्मनिवेदनांची भाषा वेगवेगळी असायला हवी हे ओघानेच आले. कारण मातृभाषा एकच असली तरी प्रत्येक व्यक्तीची एक विशिष्ट स्वतंत्र भाषा असते. पुरुषांची भाषा वेगळी, बायकांची भाषा वेगळी. इतकंच नव्हे तर प्रत्येक स्त्रीची व प्रत्येक पुरुषाची भाषा वेगवेगळी असते. इथे मात्र दोघांच्याही निवेदनातील भाषा सारखीच आहे. पुष्पाचं पत्रदेखील त्याच भाषेत आहे. इतकंच काय, त्यांच्या मोलकरणीच्या व त्यांच्या भाषेत काहीही







अनुक्रमणिका

फरक नाही. ती म्हणूनच आत्मनिवेदने न वाटता लेखकाचीच निवेदने वाटतात. सुरेखा व अरविंद यांच्या व्यक्तिरेखा अस्पष्ट, धूसर होण्याचं हे एक कारण आहे. ही निवेदने थोडी फार ठरीव साच्याची होण्याचं कारण, जोशींच्या निवेदन शैलीवर भाव्यांची पडलेली छाप हे असावं असं मला वाटतं.

'स्वप्न' ह्या पहिल्याच कादंबरीने श्री. जोशींनी वाचकांच्या मनात काही अपेक्षा निर्माण केल्या होत्या. 'शतरंज'ने निश्चितपणे भरच घातली आहे.

— कृष्णा घाळिंजकर

## एक दुर्मिळ संस्कार चित्र !

मराठी वाचकाला परिचित असलेले — लघुनिबंधक आणि कथाकार श्री. प्रभाकर अत्रे यांनी घडविलेले 'मीलन' हे निःसंशय त्यांच्या टोपीत आणखी एक पीस खोवून जाते.

'आज जयश्रीचे लग्न आहे, आज ती मला सोडून आपल्या . . . ' अशा सुरुवातीने 'मीलना'कडे केलेली वाटचाल आपल्याबरोबरच वाचकांना प्रवास घडविते. आणि प्रत्येक मैलाच्या दगडाजवळ—भावनांच्या ओलाव्याचे, विसाव्याचे क्षण देऊन जाते. जयश्रीचे तिच्या रक्तसिद्ध आणि ईश्वरदत्त अशा दोन पित्यांशी मीलन आणि तिच्या सुयोग्य पतीशी मीलन असा या कथेचा शेवटचा टप्पा!

ही कथा थोडक्यात अशी सांगता येईल— 'एक मुलगी — निर्मला पुराणिक — वडील मास्तर . . . अर्थात गरीब — सावत्र आई— तिचा जाच — मुलगी सोशिक — 'मला आई हवी' . . या भावनेने जगणारी — आई आई-पणा सोडून वागणारी — पित्याची सर्वतोपरी कुचंबणा — निर्मलेचा मनःप्रक्षोभ — ती वैतागून आईला बोलते — अखेर घरून निघते — आत्महत्या करून 'सुटण्याचा' निश्चय — तिथे तिला वाचवणारा एक — हाच तिचा ईश्वरदत्त पिता . . . स्वतः एकाकी संसार सुखाला आचवलेला . . आपल्या प्रिय मुलीच्या मृत्यूनंतरही तिला न विसरणारा तिला आपण सांभाळले नाही, मोठे केले नाही; याची खंत बाळगणारा — तो या 'पोरीला' घेतो — स्वतःची 'विद्या' मानतो आणि आत्महत्या करू पहाणाऱ्या निर्मला पुराणिकचा नवा जन्म होतो; जयश्री बापट म्हणून. अण्णा बापटांची मुलगी. सगळे प्रगतीचे टप्पे गाठून अखेर मेडिकल कॉलेजात पहिल्या वर्षाचा अभ्यास करणारी जयश्री बापट — आणि इथे तिची आणि जयंत धर्माधिकारीची ओळख — योग्य वेळ येताच अण्णांनी तात्या पुराणिक—मास्तर यांचा केलेला शोध आणि अखेर कन्यादान . . तात्यांनी भावनांचे कढ येत असताना कन्यावियोगाचे दुःख अंतरी साठवित केलेले कन्यादान! आणि निर्मला— जयश्री — आणि आता जयश्री धर्माधिकारी होणारी आपली मुलगी जाईल आणि आपण पुन्हा एकाकी होणार ' असे म्हणणारे अण्णा त्यांच्या दुःखाचा चटका लावून जातात.

सबंध कथा वाचल्यावर आणखी दोन पुस्तकांची आठवण होणे अपरिहार्य असल्याचे जाणवते. एक ज्याचा या 'मीलना'त उल्लेख आहे ते 'तुझे आहे तुजपाशी' हे नाटक आणि दुसरे 'आभाळाचा रंग निळा' ही कादंबरी. प्रा. ल. ग. जोग यांची. पैकी 'तुझे आहे तुजपाशी'मधील काकाजी ही नाट्यनिर्मिती आहे — परन्तु येथे अण्णा बापट ही जयश्रीच्या भग्न आयुष्याला जीवन आणि जीवनदृष्टी देणारी थोर व्यक्तित्वाची कलाकृती आहे . . जयश्रीच्या सर्वच सुप्त-जागृत गुणांनी जडणघडण करून तिचे व्यक्तित्व भावमयी नि उदात्त घडविणारे अण्णा बापट हे स्वतःच थोर ठरतात. माणूस आणि भावना जगविणारे ठरतात. जयश्री हे त्यांच्या आयुष्याचे सार्थक आहे. धन्यता आहे. एकाकी आयुष्याची पोकळी भरून टाकणारी 'लेक' आहे. परंतु 'आभाळाचा रंग निळा' या पुस्तकाची आठवण होते ती काहीशा विरोधाभासाने! त्यातील आप्पा आणि 'मीलना'तील अण्णा— दोघेही आपली कथा स्वतःच सांगतात — दोघांकडे वाढणाऱ्या आणि पुढे लग्न होऊन दुसऱ्या घरी जाणाऱ्या मुली या आधी तशाच कुठल्या तरी अपघाताने त्यांच्या आश्रयाला आल्या आहेत. पण इथून पुढे संविधानकात फरक पडतो. कारण 'आभाळाचा रंग' हा 'शब्दात व्यक्त होऊ पहाणारा उत्कट अनुभव आहे.' आप्पांना आपल्याच आश्रित मुलीबद्दल 'काही' वाटावयास लावणारा आहे. तर 'मीलना'तील अण्णा' आपल्या प्रिय कन्येला आत्यंतिक उदात्ततेच्या शिखरावर बसविणारे मार्गदर्शक आहेत. तिच्या बारीक सारीक गोष्टींना जपणारे आहेत. तिच्यावर कन्यावत् प्रेम करून त्या छिन्नीने 'व्यक्तित्वाचे' निर्माण करणारे स्वतः








एकाकीपणाचे दुःख पचविणारे कुशल सौंदर्यवादी गृहस्थ आहेत. आपल्या मानस कन्येला भाग्यवान ठरविणारे आहेत. आणि तरीही आपल्या मनातील स्पंदने अनिवार्यपणे जोपासणारे आहेत. बाळबोध घराण्यात वाढणाऱ्या – 'मला कुशीत घेऊन झोपण्यासाठी आई हवी' म्हणणाऱ्या या मुलीवर तितकेच संवेदनयुक्त संस्कार या अण्णांनी घडविले आहेत. 'मातापित्यांनी' घडविण्याचे संस्कार एकट्या अण्णांनी घडविले आहेत. परमेश्वर–वडिलधारी माणसें–अलौकिक गुरुभक्ती–सौंदर्यनिष्ठा–धैर्य–कौटुंबिक एकात्मता असे अनेक सनातन व आधुनिक विषय अण्णांनी आपल्या चारित्र्याने जयश्रीला सोपे करून शिकविले आहेत. त्यात भावनांचा ओलावा आणि बुद्धीची सुसूत्रता यांचा प्रत्यय येतो.

तुमच्याशिवाय जगू शकणार नाही. मला कुणीतरी तुमच्यापासून दूर ओढून नेत आहे – असं जयश्री म्हणते तेव्हा – 'वेडी आहेस. आपण जेवून घेऊ या चल. उपाशी पोटी असे विचार येतात कधी कधी माणसाच्या मनात' ही अण्णांनी घातलेली समजूत अगर 'किंबहुना सारी लौकिक गणिते जेव्हा चुकतात तेव्हाच प्रीतीचे गणित सुटते' हे सुभाषितवजा वचन–खास 'आत्रेय' लिखाण म्हणून सांगता येईल. नाटकाच्या आधी जयंत-जयश्रीने अण्णांचा घेतलेला आशीर्वाद आणि त्यावेळचा विनोद हा उत्कट भावनेची सहजता दाखवून जातो. 'तुमची जोडी तर भैय्या फारच छान दिसते' असं म्हणणारा–काकाजीची भूमिका करणारा विद्यार्थी–ही योजनाच पारदर्शक आहे. तर 'जयश्री गेल्यापासून मी चित्रपट सोडला आहे. मी चहा घेत नाही. टिळक वारले त्या दिवशी मी चहा सोडला.' असं म्हणणारे तात्या हे मास्तर असले तरी त्या त्या युगात वावरणारे 'पुराणिक' सुद्धा आहेत. त्याचबरोबर कन्याप्रेमाची सांगड राष्ट्रप्रेमाशी घालणारी विसंगती सुद्धा त्यात डोकावतेच! पण खरीखुरी भावना पित्याचं मन हे त्यांच्या 'पण माझ्या मनातलं तिचं रूप त्या बदलत्या नावाला पुसून टाकता येईल काय?' या शब्दांत व्यक्त होत नाही असं म्हणणं शक्य आहे काय? अर्थात 'कधीच नाही' हे उत्तर लेखकानेच अण्णांच्या तोंडी घालून त्यावर शिक्कामोर्तब केले आहे. आजच्या प्रगत ललित लिखाणामध्ये जे अनेक प्रकार–दैनंदिनी–पत्र–आत्मपरीक्षण विचार प्रक्रिया–मार्गदर्शन–सत्यान्वेष आणि भावनांशी प्रामाणिकपणा–हे सर्व काही सांभाळून लेखकाने घडविलेले हे दोन पित्यांचे–त्यांच्या कन्येचे आणि मग जावयाचे मीलन हे एक संस्कारचित्र आहे. कमीतकमी घटना निवडून कौशल्याने उभी केलेली पितापुत्रीची जोडी हे आजचे दुर्मिळ संस्कारचित्र आहे. प्रामुख्याने परिस्थितीने घडविलेले आणि विशेषतया अण्णांनी घडविलेले! !

**–प्रेमानंद मयेकर**

(**मीलन** – प्रभाकर अत्रे – प्रकाशिका : नीला चिंतामण जोशी– योजना प्रकाशन, अलिबाग. पृष्ठे १५२. मूल्य ५ रुपये)

---

[ पृष्ठ ४३ वरून – **परिसंवाद** ]

म्हटली तरी कला त्यांना सोडील की काय हा प्रश्न आहे. कला ही वयावर अवलंबून नाही तर स्फूर्तीवर अवलंबून आहे. तेव्हा निवृत्तीनंतर कलानिर्मिती करू नये म्हणून सांगणे अस्वाभाविक ठरेल. जी गोष्ट कलावंतांची तीच गोष्ट साहित्यिक, शास्त्रज्ञ आणि इतर समाज सेवकांची. त्यांच्या निवृत्तीने त्यांची सृजनशक्ती नाहीशी होणार नाही तर ती समाजसेवेसाठी त्यांना निष्काम बुद्धीने अर्पण करण्याची संधी मिळेल !

### जुन्यानव्याचा वदल : निसर्ग नियम

जुन्याविरुद्ध नवीन हा झगडा अनंत कालापासूनचा आहे. जुनी पालवी जाते नवीन येते हा निसर्ग नियम आहे पण त्या ठिकाणी झगडा होत नाही. झगडा माणसेच करतात. युद्धे माणसांनी केली आहेत. आणि झगड्याच्या मागे माणसाचा दुखावलेला स्वाभिमान पुष्कळदा असतो आणि आपली बाजू सत्य आहे हे सांगण्यासाठी समाज कल्याणाचा बुरखा पांघरतो आणि प्रस्थापितांविरुद्ध बंड पुकारतो. टाळी एक हाताने कधी वाजत नाही तसेच झगडाही केवळ एका बाजूने होत नाही. दोघेही त्याला जबाबदार असतात. तेव्हा प्रस्थापितांना जर आपल्या दैवतांचे मूल्य रहावे असे वाटत असेल तर त्यांनी झगड्याचा प्रसंगच येणार नाही अशा रीतीने वागले पाहिजे. जी मूल्ये त्यांना पवित्र वाटतात ती मूल्ये आपल्या जीवनात आचरण्याचा अव्याहत प्रयत्न त्यांनी केला आणि एखाद्या मंदिराच्या पुजाऱ्याप्रमाणे दैवताकडे लक्ष न देता स्वतःच दैवताचा मालक बनण्याचा अट्टाहास धरला नाही तर झगड्याला कारणच रहाणार नाही. पुष्कळदा झगडे हे तत्त्वापेक्षा सत्ता संपादनासाठी होतात आणि त्यावर मग तत्त्वज्ञानाचे आवरण चढविले जाते आणि प्रचार साधनांनी सामान्यजनांचा बुद्धिभेद केला जातो. या झगड्यातच जो यशस्वी होतो तो नेता बनतो. पण या बंडाच्या प्रक्रियेमध्ये पुष्कळदा जीवनाची शाश्वत मूल्ये पायदळी तुडविली जातात. बरीच जुनी दैवते फुटली जातात आणि त्या ठिकाणी त्यांची प्रस्थापना होते. जगात कधी पोकळी निर्माण झाली तरी ती कायम राहू शकत नाही, तशी जुनी दैवते गेल्याने जगाचे फारसे नुकसान होईल असे नाही किंवा नव्या दैवतांनी जग फार सुखी होईल असेही नाही. कारण एक प्रश्न सुटला की दुसरा त्याची जागा घेणारच आणि असे झगडे चालू रहाणारच. प्रश्न आहे तो हे झगडे समाज स्वास्थ्यासाठी आहेत की सत्ता स्पर्धेसाठी ?

सध्या भारतही एका क्रांतीपर्वातून जात आहे पण ही क्रांती वैज्ञानिक आहे, तिची बैठक तत्त्वज्ञानावर अधिष्ठित आहे की जागतिक क्रांतीपर्वातील हा एक आविष्कार आहे याचे सम्यग् ज्ञान आपल्याला करून घेतले पाहिजे. जे बंड तत्त्वज्ञान आणि विज्ञान यांच्या पायावर अधिष्ठित नाही ते यदाकदाचित यशस्वी झाले तरी त्याचा फायदा समाजास होत नाही. आणि नव्या प्रस्थापितांविरुद्ध बंडास कारणीभूत होते. • • •










## या वर्षाचे नोबेल पारितोषिक विजेते

# सॅम्युअल बेकेट

—दि. श्री. कराडकर

१९६९ साली साहित्याचे नोबेल पारितोषिक (अंदाजे रु. ५,५०,०००) आयरीश लेखक श्री. सॅम्युअल बेकेट ह्यांना बहाल करण्यात आले आहे. हे पारितोषिक जाहीर केले तेव्हा स्विडीश अकादमीच्या निवड समितीने मोठे मार्मिक निवेदन प्रसिद्ध केले आहे. ह्या निवेदनात ते म्हणतात—"कादंबरी व नाटक ह्यांच्या लेखनशैलीत श्री. बेकेट ह्यांनी एक वैचित्र्यपूर्ण क्रांती केली आहे. सांप्रत जग नवीनतेकडे झेपावते. आहे. अशा वेळी नवीनतेचा हव्यास बाळगून प्रगती करू इच्छिणाऱ्या कोणाही व्यक्तीला श्री. बेकेट ह्यांच्या साहित्यापासून स्फूर्ती मिळावी म्हणून त्यांच्या समग्र साहित्यसेवेचा आम्ही गौरव करीत आहोत." साहित्यात आतापर्यंत लेखकाच्या एका विशिष्ट कलाकृतीला नोबेल पारितोषिक देण्याची प्रथा होती. परंतु ह्या वर्षीचे पारितोषिक श्री. बेकेट ह्यांनी साहित्यात जे 'संशोधन' केले त्या संशोधनालाच देण्यात आले आहे. म्हणून 'संशोधक' साहित्यिक श्री. सॅम्युअल बेकेट असाच त्यांचा गौरव केला पाहिजे.

आपल्या साहित्यात बेकेट ह्यांनी जो एक बुद्धीवाद प्रतीत केला आहे त्याच्याशी मात्र हा गौरव विसंगत आहे. कलावंताच्या कुठल्याच कलाकृतीचा गौरव केव्हाही व कोणत्याही पद्धतीने करणे हे केवळ दुरापास्त आहे. जीवनामध्ये वैफल्यवाद इतका बोकाळलेला आहे की ह्या वैफल्यवादावर सौख्यमाचे कोणतेच पलिस्तर बसू शकणार नाही, अशी विचारसरणी असलेल्या बेकेटना ह्या पारितोषिकामुळे आनंद खचित वाटणार नाही ! प्रेम ही एक अशक्य संवेदना आहे असे मानणाऱ्या बेकेटना आपल्या साहित्यावर इतरेजन प्रेम करतात हे मुळी पटणारच नाही. एका चित्रकाराच्या कलाकृतीचे परीक्षण करताना बेकेट लिहितात—"ह्या कृतीसंबंधी काही सांगावे असे मुळी नाहीच, ज्या मोजपट्टीने ह्याचा गौरव करावा अशी मोजपट्टीही नाही, ज्याच्यासारखी ही कलाकृती आहे असेही सांगायला काही नाही, वर्णन करायला जी विचारशक्ती लागते ती विचारशक्तीही नाही, वर्णन करण्याची इच्छाही नाही इतकेच काय पण 'दोन शब्द' सांगण्याचे सौजन्यही नाही !" ज्या कलाकृतीसंबंधी अशी भावना निर्माण होते तीच यशस्वी कलाकृती होय. कलावंताचे यश ह्या 'संभ्रम' अवस्थेत आहे !

नवमतवादी लेखकांमध्ये बेकेट ह्यांनी जे अग्रगण्य स्थान संपादन केले आहे त्याचे मुख्य कारण श्री. बेकेट ह्यांची ही विचारप्रणालीच असावी. जगावेगळ्या मतप्रणालीचा हा लेखक १९०६ साली डब्लीन येथे जन्मला. बेकेट ह्यांचे आई-वडील हे सुधारणावादी मध्यमवर्गीय होते. १९२० साली पोर्टओरा येथील रॉयल स्कूलमध्ये शिकत असताना बेकेट ह्यांचा क्रिकेट व फुटबॉल ह्या खेळांकडे विशेष कल होता. बुद्धिवान विद्यार्थी म्हणूनही त्यांचा लौकिक होता. १९२३ साली ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. १९२७ साली 'भाषा' हा विषय घेऊन ते पदवीधर झाले. ह्यानंतर त्याच कॉलेजमध्ये—म्हणजे ट्रिनिटी कॉलेजमध्येच—त्यांची लेक्चरर म्हणून नेमणूक करण्यात आली. पुढे 'स्कॉलर' म्हणून पॅरिस येथील कॉलेजसाठी लेक्चरर म्हणून त्यांची निवड करण्यात आली. १९२८ साली ते पॅरिसला गेले व त्यांच्या जीवनात एक महत्त्वाचा बदल घडून आला. सुप्रसिद्ध विचारमतवादी जेम्स् जॉइस ह्यांच्याशी त्यांचा संबंध आला. जेम्स् जॉइस ह्यांच्या विचारप्रणालीनुसार काम करणारा जो एक गट होता त्या गटाबरोबर श्री. बेकेट काम करू लागले. वयाच्या अवघ्या २३ व्या वर्षी त्यांनी जॉइस ह्यांच्या "वर्क इन प्रोग्रेस"वर जो एक निबंध लिहिला तो सर्वत्र जगभर गाजला. त्याचप्रमाणे पॅरिसमधील ह्या वास्तव्यात एका काव्यस्पर्धेत त्यांना पहिले पारितोषिक मिळाले.

१९३० साली श्री. सॅम्युअल बेकेट डब्लीनला परतले. तेथील ट्रिनिटी कॉलेजमध्ये फ्रेंच शिकविण्यासाठी त्यांची नेमणूक करण्यात आली होती; परंतु येथील कॉलेजच्या वातावरणाशी त्यांचे कधीच जुळले नाही. परिणामी त्यांनी आपल्या पदाचा राजीनामा दिला. त्यानंतर सात वर्षे सबंध युरोपभर ते वावरले. जीवनाचा विविध अनुभव त्यांनी ह्या भटकंतीत संपादिला. त्यानंतर १९३७ साली कायमचे वास्तव्य करण्यासाठी ते पॅरिसला आले. ह्यावेळी त्यांनी बराच लौकिक मिळविला होता. १९३१ साली ट्रिनिटी कॉलेजमधून








## श्री. सॅम्युअल बेकेट यांची साहित्य-संपदा

| कादंबऱ्या | नाटके |
|---|---|
| मोअर प्रिक्स् दॅन कीक्स् (१९३४) | वेटिंग फॉर गोदो (१९५२) |
| मर्फी (१९३८) | अ‍ॅक्ट विदाऊट वर्डस् (१९५७) |
| वॅट्ट (१९५३) | ऑल दॅट फॉल (१९५७) |
| मोल्लोय (१९५१) | क्रेप्स् लास्ट टेप (१९५९) |
| मॅलोन म्यूर्ट (१९५१) | एम्बर्स् (१९५९) |
| द अन्नेमेबल (१९५३) | हॅपी डेज (१९६१) |
| फ्रॉम अॅन् अॅबन्डंट वर्क (१९५७) | |
| हाऊ इट इज (१९६१) | |
| **निबंध** | **कविता** |
| प्राऊस्ट (१९३१) | व्होरोस्कोप (१९३०) |
| डान्टे, ब्रुनो, व्हिको, जॉइस (१९२९) | एकोज् बोन्स् (१९३५) |

ते एम्. ए. झाले होते. १९३१ सालीच "प्राऊस्ट" नावाने त्यांचे टीकात्मक लेख प्रसिद्ध झाले होते. "होरोस्कोप" (१९३०) व "एकोज् बोन्स्" (१९३५) हे त्यांचे दोन काव्यसंग्रहही प्रसिद्ध झाले होते. "मोअर प्रिक्स् दॅन कीक्स्" (१९३४) हा कथासंग्रही नांवलौकिक मिळवून होता.

१९३७ नंतरच्या पॅरिसमधील वास्तव्यात श्री. बेकेट ह्यांचे जॉइस ह्यांच्याशी संबंध घनिष्ट झाले. बेकेट हे जॉइस ह्यांचे वैयक्तिक सचीव बनले. मात्र ह्यामुळे हे संबंध घनिष्ट झाले असे म्हणता येणार नाही. पुढे तर अशीही अफवा उठली की जॉइस ह्यांची मुलगी लुसिआ ही आपल्या तीर्थरूपांच्या ह्या तरुण आयरीश मित्रावरोवर प्रेमात पडली आहे.

श्री. बेकेट ह्यांचे जॉइस हे आदर्श नव्हते. म्हणूनच सर हर्बर्ट रीड ह्यांचीही विचारप्रणाली ते अभ्यासत असत. त्यांची "मर्फी" ही पहिली कादंबरी श्री. रीड ह्यांच्या प्रयत्नानेच १९३८ साली प्रसिद्ध झाली.

१९३९ च्या सप्टेंबरमध्ये युद्ध सुरू झाले तेव्हा बेकेट आयलंड-मध्ये होते; परंतु लवकरच ते पॅरिसला आले. युद्धकाळात ते भूमिगत राहून फ्रेंच क्रांतिकारकांना मदत करीत होते. ह्याच काळात त्यांनी आपल्या "वॅट" कादंबरीचे कथानक लिहून काढले मात्र योग असा की ही कादंबरी १९५३ साली प्रसिद्ध झाली. भूमिगत असताना त्यांचा अनुभव खूप समृद्ध झाला. नवनवीन कल्पना त्यांना ह्याच काळात सुचल्या. इतकेच नाही तर जीवनाबद्दलचा त्यांचा भकास-वादी दृष्टिकोन युद्धातील हत्या पाहून तयार झाला असावा असे त्यांच्या टीकाकारांचे म्हणणे आहे. युद्धानंतर श्री. बेकेट यांच्या जीवनाला एक वेगळीच दिशा प्राप्त झाली. ह्या काळानंतर त्यांचे जे साहित्य प्रसिद्ध झाले त्याला एक वेगळीच धार होती.

ह्या वेगळेपणातूनच त्यांच्या जगभर प्रसिद्ध पावलेल्या नाट्यकृतीने जन्म घेतला. **वेटिंग फॉर गोदो** हीच ती नाट्यकृती. १९५३ साली पॅरिसच्या रंगमंचावर ह्या नाटकाचा पहिला प्रयोग सादर करण्यात आला. मुळात हे नाटक फ्रेंच भाषेत लिहिण्यात आले. पुढे १९५४ साली लेखकानेच त्याला इंग्रजी पोषाख चढविला. बेकेट ह्यांच्या गाजलेल्या अनेक कलाकृती प्रथम फ्रेंच भाषेतून लिहिल्या गेल्या आहेत. "अ‍ॅक्ट विदाऊट वर्डस्" हे त्यांचे दुसरे नाटकही १९५७ साली फ्रेंच भाषेत प्रसिद्ध झाले, नंतर लेखकानेच १९५८ साली त्याचे इंग्रजीत भाषांतर केले.

बेकेट ह्यांच्या समग्र वाङ्मयात जगात चालत असलेल्या अंदाधुंदीवर खूप ताशेरे ओढलेले आढळतात. किंबहुना ते तर असे प्रतिपादन करतात की सांप्रत जगावर मानव जातीचा ताबा राहिलेला नाही.

सध्या पॅरिसमध्येच बेकेट जीवन व्यतीत करीत आहेत. शांतपणे, संथपण. पॅरिसमधील सांस्कृतिक वा साहित्यविषयक चळवळीत ते कधीच भाग घेत नाहीत वा त्याबाबत कोणताही उत्साह दाखवीत नाहीत. साहित्यिकांच्या कोंडाळ्यापासून ते दूर असतात.

पॅरिसच्या दौऱ्यावर गेलेल्या एका अमेरिकन लेखकाने श्री. बेकेट ह्यांचे वर्णन करताना लिहिले आहे–

" .पाहताच क्षणी एक ओबडधोबड आयरीश असामी असे ते वाटतात. त्यांची चेहरेपट्टी भव्य आहे पण रेखीव नाही. धार नसलेल्या छिन्नीने पुतळ्याचा चेहरा घडविला तर त्यात जी सफाई वाटत नाही तसा त्यांचा चेहरा वाटतो. डोईवरचे केस अस्ताव्यस्त पसरलेले आहेत परंतु केस मात्र मलायम भासतात, राठ नाहीत. त्यांच्या डोळ्यांचा रंग फिका निळसर आहे. चेहऱ्याच्या मानाने ते खोल वाटतात; तथापी त्या डोळ्यांमध्ये एक भिरभिरती नजर डोकावत असते. सतत कशाचा तरी ते डोळे वेध घेत आहेत असा भास होतो. ते क्वचितच् हसतात मात्र हसले की दुसऱ्याला जिंकणारे गोड हास्य त्यांच्या ओठातून उमलते. ढोलकीवर 'मंजुळ' आवाज काढल्यानंतर तो आवाज जसा कानाला लागेल तसा त्यांचा आवाज वाटतो ! परंतु ह्या आवाजाला कर्कशतेची धार आहे. त्यांच्या चेहऱ्याला हा आवाज खुलून दिसतो ! ते बोलू लागले की गडबडीने बोलतात ........"

● ● ●











## समाजवाद ( खरोखरच ) येणार ?

भारतातील विघटनकारी व वारसा हक्काने चालत आलेल्या पारंपारिक प्रवृत्तीची प्रक्रिया पूर्ण झाली आणि देशाला एकसंध शासन देऊ शकणारी व स्वातंत्र्य चळवळीतून उदयास आलेली प्रेरणा देण्याची इतिहासदत्त कामगिरी बजावू शकणारी काँग्रेस नामक संघटना दुभंगली. ऐक्याची भाषा बोलणेही बंद झाले. उणीदुणी काढण्यात स्पर्धा सुरू झाली. सीमेवरच्या शत्रूंचे विस्मरण झाले, घरभेद्यांची जी पिलावळ बंगाल, केरळ, आंध्रादि प्रांतात वाढते आहे तिच्याकडे क्षमेचा ओघ वळला आणि स्वातंत्र्य लढ्यात ज्यांनी कष्ट, त्यागाचे खतपाणी घातले अशांचे शिरकाण हे नवे (समाजवादी) ध्येय जणु इथे अवतरले. माओपेक्षा मोरारजी-कामराज आणि याह्याखानपेक्षा रामसुभग सिंग, कोसिगिनपेक्षा तारकेश्वरी-सुचेता अधिक निषिद्ध ठरल्या आणि गेल्या बावीस वर्षात समाजवादी वाटचाल रोखून धरणारे मोरारजी, अप्पा, कामराज, मेहता आदि दगड मार्गातून निपटून काढून समाजवादी सूर्याचा मार्ग आता खुला झाला असल्याची ग्वाही शासकीय दवंडी–पिटण्यात येऊ लागली. आणि आपल्याच कळपातली माणसे कशी खरी, सच्ची व सर्वगुणसंपन्न आहेत हे आम जनतेला पटविण्याचा प्रयत्न द्विपक्षी सुरू झाला. ह्या प्रचारात अखेर 'सत्यमेव'-मधील 'सत्य' गुदमरते आहे आणि गांधी-शताब्दीच्या वर्षात असत्याचरण व असत्य भाषण ह्या प्रकारची दुहेरी 'हिंसा' होते आहे ह्या गोष्टीचे ह्या दोन्ही (गांधी-प्रणित) काँग्रेसना विस्मरण झाले. सत्ता ज्याचे हाती असते त्याची बाजू नेहमीच खरी असते असे नाही पण ती नेहमीच जड असते व त्या 'वजना'वर ती काही काळ 'बाजी' मारीत राहते हेही शाश्वत सत्य आहे. ब्रिटिश राज्यकर्तेही असेच वागत असत. अनिर्बंध सत्ता जेव्हा एकसंध काँग्रेस, केंद्रात व राज्यात उपभोगत होती तेव्हाही सत्तेच्या 'वजना'वर अनेक असत्ये सत्याचा मुलामा घेऊन मिरवताना दिसत असत. अनेक फालतू व्यक्तींना व गोष्टींना त्या काळी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. अनेक भ्रमांना तात्विक अधिष्ठान दिले गेले होते. आणि अनेक असत्ये दडवून ठेवून ती हिमालयाच्या उतरणीवरून खाली उतरून आमचा तेजोभंग करीपर्यंत 'राष्ट्रीय हिता' च्या नावावर सोयिस्कर मौन पाळले जात होते. गेल्या बावीस वर्षात ह्या देशात समाजवादाचा सतत जयजयकार केला जात असताना व त्यासाठी 'मॉस्को' चालीवर पंचवार्षिक योजनांचे 'ग्रंथराज' जन्म घेत असताना आणि सर्व देशभर एकाच पक्षाची सर्वंकष सत्ता असताना इथे समाजवादाचे उन्ह पडलेच नाही. "श्रीमंत श्रीमंत होत गेले व गरीब अधिक गरीब होत गेले" अशी ग्वाही खुद्द पंडितजींनाच द्यावी लागली. ठीक आहे. नंतर बरेचसे पाणी (काँग्रेसच्या) पुलाखालून वाहून गेले आहे. आणि विघटनाची प्रक्रिया पूर्ण झाली असून प्रतिदिनी आव्हाने-प्रति आव्हाने दिली जात आहेत. सर्व राष्ट्रीय प्रश्न आता जणु संपले असून सीमेवर व सर्वत्र 'आलबेल' आहे. त्यामुळे भिंतीला तुंबड्या लावण्याचे फार महत्वाचे 'राष्ट्रीय' कर्तव्य पार पाडण्यासाठी आमचे अ. भा. पुढारी आमने सामने उभे ठाकले आहेत असे तूर्त तरी दृश्य दिसते. हे दृश्य अटळ वा अपरिहार्य असते वा एखाद्या फार मोठ्या तात्विक कारणासाठी हे 'महाभारत' घडत असते तर कुणालाच त्याची खंत वाटली नसती. परंतु हे सारे घडले आहे त्यात बरवर काही तात्विक कारणांचा धुरळा उडालेला वा उडत असलेला दिसत असला तरीही जे घडले त्यात 'तत्वापेक्षा' 'सत्तावाद'च जास्त दडलेला आहे आणि नंतर उ. प्रदेश, बिहार, गुजरात आदि ठिकाणी जे प्रयत्न चालू आहेत त्यावरून तर 'सत्तावाद' स्पष्ट रूप घेऊ लागला आहे याचाच प्रत्यय येतो आहे. एकच सवाल, विचारावासा वाटतो. केरळमध्ये लोकशाही पद्धतीने निवडून आलेले नंबुद्रीपाद शासन वा प. बंगालमधील मुकर्जी-बसू शासन जर इंडिकेट काँग्रेसला चालते तर मग गुप्ता, देसाईंची मंत्रिमंडळे पराभूत व्हावीत म्हणून येवढी उतावळी कशासाठी ? घटना मोडण्यासाठीच घटनेची चौकट स्वीकारून 'काम' करणारांना मात्र अभय आणि राष्ट्र, लोकशाही व समाजवाद यावर निष्ठा असणारांवर मात्र 'की जय' म्हणण्याचे नाकारल्याबद्दल येवढी खप्पा मर्जी कशासाठी ? पण सत्ता आणि सत्ताबाज नेहमीच आंधळे असतात. सामान्याना दिसणारे, उमगणारे सत्य त्यांना दिसू शकत नाही. आणि म्हणूनच अनेक सत्ये सोयिस्करपणे नाकारता येतात. आणि १९६२/६५-ची किंमत देऊन ती 'महाग' सत्ये जनसामान्यांना पचवावी लागतात. इथे देशी हेच गेल्या बावीस वर्षात घडत आले आहे. आजही तेच घडते आहे.

ह्या पार्श्वभूमीवर इंडिकेट-सिंडिकेट काँग्रेस उभ्या राहिल्या असून आता विरोधी दलांच्या पावित्र्यात त्या उभ्या आहेत–अहमदाबाद (गांधीनगर) व मुंबई (आझादनगर) येथे ह्या दोन्ही पक्षांची अधिवेशने नुकतीच पार पडली. सत्तावादी काँग्रेसचे अधिवेशन मुंबईत शाही इतमामाने पार पडले. तर आद्य काँग्रेस (वा संघटना काँग्रेस)चे अधिवेशन अहमदाबादेस पार पडले. अहमदाबाद काय किंवा मुंबई काय ही दोन्ही अधिवेशने पक्षीय अधिवेशने असली तरी ह्या दोन्ही अधिवेशनांना "राष्ट्रीय" महत्त्व प्राप्त झाले होते. एरव्ही







## समाजवाद आवळला जातोय!

एकाच व्यासपीठावर ही माणसे आम्ही पहात आलो होतो. त्यांच्या तोंडची परिभाषाही आम्हाला पूर्णपणे परिचित अशीच आहे. त्या त्या माणसांचे व्यक्तित्व, त्यांचा त्याग, त्यांची जनसेवा (वा खुर्चीनिष्ठा) ह्यांचा संपूर्ण परिचय आम्हाला झालेला आहे. आणि तरीही ह्या दोन अधिवेशनांबाबत उत्सुकतेची तार खूप ताणली गेली होती हेही नाकारता येणार नाही. सत्ता काँग्रेसजवळ सत्ता आहे. प्रलोभने आहेत. मानसन्मान आहेत, खुर्च्या आहेत आणि 'समाजवादी द्रव्य'ही भरपूर आहे. त्यामुळे अहमदाबादला एखादे 'गॅदरिंग' होईल अशी कल्पना काहींनी करून घेतली. परंतु संघटना काँग्रेसजवळ संघटना आहे. परंपरा आहे. काही निष्ठाही आहेत ह्याचा प्रत्यय गांधीनगरच्या गर्दीने दिला. सत्ता शासनाच्या व 'बळी'च्या विरुद्ध उभे रहायला ताठ कणा लागतो. तो कणा असणारी माणसे कमी नाहीत, नगण्य नाहीत ह्याचे उत्तर अहमदाबादला देण्याचा प्रयत्न झाला. आणि मुंबईची काँग्रेस तर सरकारी काँग्रेस होती. त्यामुळे प्रतिनिधींना समाजवादी पॉश हॉटेलसमध्ये रहायला मिळाले व 'समाजवादी' श्रीखंडाचा खातमा करण्याची संधी मिळाली. लक्षावधी रुपये खर्चून हे दोन समाजवादी 'जलसे' पार पडले. यातले कुणाचे गाणे अधिक रंगले वा सुरेल झाले ह्याचे उत्तर देणे तसे कठिणच! सध्या समाजवादी 'झिंग' साऱ्यांनाच चढलेली असल्याने खरे उत्तर मिळणेही कठिण! परंतु आत्यंतिक अभिनिवेशाने बोलण्यासारखी परिस्थिती दोन्हीही ठिकाणी नव्हती असे म्हणणे भाग आहे. दोन्ही ठिकाणी झालेले ठराव पाहिले तर "काँग्रेस दुभंगली का ?" ह्याचे उत्तर तात्विक नाही – नसले पाहिजे ह्याचा प्रत्यय येतो. 'समाजवादा'च्या परिभाषेपुरता तरी दोन्ही काँग्रेसमध्ये मतभेद नाही. आणि तरीही काँग्रेस दुभंगली ह्याची कारणे इतरत्रच शोधली पाहिजेत. ज्या पद्धतीने पंतप्रधान तूर्तास प्रत्येक रशियन गोष्टीचे कौतुक करीत सुटल्या आहेत व ज्या पद्धतीने कम्युनिस्ट ह्या देशातील हिंसात्मक उद्रेकांना खतपाणी घालीत आहेत ती पद्धत पाहिली की हे विघटनही एका 'त्रयस्थ' पण 'इंटरेस्टेड' पार्टीची करामत असली पाहिजे असे वाटू लागते. 'रशियाला म्हणे वसाहतवाद मान्य नाही म्हणून त्यांचे आमचे जुळले–जुळते' असे पंतप्रधान म्हणाल्या. रशियाचा वसाहतवाद कशा प्रकारचा आहे, तो किती समर्थ आहे आणि किती आक्रमणशीलही आहे ह्याचे उत्तर पंतप्रधानांनी झेकोस्लॉव्हियाला, हंगेरीला विचारावे आणि मग रशियन धोरणाचे कौतुक करावे. केरळात जे रशियन सांस्कृतिक केंद्र उभे होत होते– विना अनुमति उभे रहात होते ते का ? व कुणाच्या कृपाप्रसादाने ? गेल्या चार महिन्यात रशियाने जी रिझर्व बँकेच्या रुपये शिलकीतून दोन कोटींची उचल केली ती का ? कशासाठी ? अमेरिकन चंद्र मानव मुंबईला आले त्याच्या आदल्याच दिवशी पंतप्रधान मुंबईला धावती भेट देऊन गेल्या. काही तासही मुंबईत न थांबण्याइतकी महत्त्वाची व घाईची कामे त्यांना होती काय ? की रशियन 'मास्टर'ला ते बरे दिसणार नाही असे त्यांना वाटले ? प. बंगाल, केरळ येथील लाल उपद्व्यापांबाबतची, उघडउघडपणे बोलल्या जाणाऱ्या 'घटनामोडी'च्या लाल परिभाषेबद्दलचे त्यांचे नेमके मत काय ? 'डॉ. घोष यानी कम्युनिस्ट मंत्री घ्यावा' अशी जी विनंति त्यांनी डॉ. घोषांना केली ती कोणत्या व्यापक व राष्ट्रीय हितासाठी केली ह्याचा खुलासा त्या करतील काय ? पण तूर्त तरी त्यांना सवड मिळणार नाही. कारण संघटना काँग्रेस खणून काढणे व उत्तर प्रदेश, गुजरात, बिहार इत्यादि प्रांतात त्यांना बरेच विधायक कार्य करणे आहे. पण हे श्रम त्यांना टाळता आले असते असे मला वाटते. संघटनेत जर त्यांचे येवढे वजन होते (व आहे हे मुंबईत सिद्ध झाले आहे) तर मग त्यांनी काँग्रेसची अशी मोडतोड करण्यासाठी विळे, कोयते वापरण्याऐवजी काँग्रेसच जिंकण्याचा राजमान्य व लोकमान्य मार्ग कां स्वीकारला नाही ? की काँग्रेस जिंकूनही 'समाजवाद' (त्यांना अभिप्रेत असलेला) आणता येणार नाही अशी भीति त्यांना वाटली ? (की कुणी घातली ?) दोन्ही काँग्रेसचे ठराव, भाषणे वाचली की 'दोन काँग्रेस का ?' ह्या प्रश्नाचा घोळ मनात कायमचा राहतो. आणि 'समाजवादी' घोषणांसाठी (तूर्त तरी घोषणाच) द्विपक्षी जे लक्षावधी रुपये खर्च झाले (व पुढे होतील) त्याची खरोखरच गरज आहे काय ? होती काय? असा प्रश्न कायमच राहतो. अखेर सत्तेची खुर्ची वा खुर्च्या कायम टिकविण्यासाठी तूर्त 'खुषीकरणा'चे अनेक प्रयोग शासकीय काँग्रेसने जाहीर केले आहेत. 'जातीयवादा'-विरुद्ध लढ्याचे रणशिंग (सालाबादप्रमाणेच) फुंकण्यात आले असून 'जनसंघा'ला 'लक्ष्य' बनविण्यात आले आहे. परंतु 'जातीयवादा'च्या मूलभूत कारणांबाबत मात्र काहीही नवीन सांगण्यात आले नाही. हिंदुस्थानात हिंदु हे फक्त 'जातीय' आहेत

त्यांची 'जातीयता' घालविण्यासाठी फक्त हिंदूकोड बिल हवे, निधर्मी राज्यात, समान नागरी कायद्याची मागणी करणे मात्र प्रतिगामित्वाचे लक्षण ! 'समाजवादा'ची व्याख्या 'राष्ट्रीयीकरणात' संपते. आता सरकारी यंत्रणा किती कार्यतत्पर आहे याचा प्रत्यय गेल्या वीस वर्षात जनतेला भरपूर आला असताना व तद्‌विषयक ज्ञान, माणसे आणि क्षमता ह्या गोष्टींचा विचार न करता प्रत्येक गोष्टीचे 'राष्ट्रीयीकरण' करण्याची परिभाषा वापरणे हे काही राजकीय प्रगल्भतेचे गमक खासच म्हणता येणार नाही. पण आपण अधिक पुरोगामी, प्रगत व क्रांतिकारक प्रवृत्तीचे आहोत हे सिद्ध करण्यासाठी आज दोन्ही कॉंग्रेसची प्यादी भडक–अधिक भडक–अधिकाधिक भडक भाषणे करण्यात निमग्न आहेत. 'किंग कॅन डू नो रॉंग' ह्या न्यायाने शासकीय यंत्रणा कधी चुकत नाही असे मानायला आपण शिकले पाहिजे. प्रत्येक आरोपाचा इन्कार ! मग फार आग्रह धरला की फायलीच गहाळ होणे वगैरे प्रकार नेहमीच घडतात. पण 'समाजवादी' सूर्यदर्शनासाठी ह्या अंधारातून (व अंधाराकडे) वाटचाल केलीच पाहिजे. काहीसा अंधार पचवायला शिकलं पाहिजे. राष्ट्रीयीकरण, संस्थानिकांचे तनखे, शेतीविषयक नवे निर्बंध, भारतीयीकरण विरोध आदि गोष्टींना मुंबई कॉंग्रेसमध्ये प्राधान्य दिले गेले. "करबुडव्यांना हुडकून काढून शासन केले पाहिजे" अशी एक तुफान विनोदी सूचनाही करण्यात आली (तेव्हा श्रोत्यात खसखस पिकली असा वृत्तपत्रीय 'रिपोर्ट' आहे) एकूण अधिवेशनात इंदिराजींनी 'सिंडिकेट'वाल्यांबद्दल वा 'त्या' अधिवेशनाबद्दल फारसे कुणाला बोलू दिले नसले तरीही शासनयंत्रणा, प्रलोभने, पैसा, ऐषआरामांची सोय' उपलब्ध नसताना व बावीस पंचवीस मैल गांधीनगर लांब असताना तेथे जी गर्दी जमली होती तिच्या प्रमाणात मुंबईचा 'सरकारी जलसा' (मुंबईची लोकसंख्या साधनांची विपुलता असूनही) रंगला नाही असेच मत अनेक पत्रकारांनी व्यक्त केले आहे. अधिवेशनानंतरच्या काळात 'तरुण तुर्क' सतत नाराजीने बोलत आहेत. क्रांतिकारी कॉंग्रेस पुरेशी क्रांतिकारक नाही असा त्यांचा दावा दिसतो. 'कार्यकारिणी'-बद्दलही त्यांच्या उरी खंत आहेच. 'बॅंक राष्ट्रीयीकरण' अजूनही गुलदस्तात आहे आणि 'न्यायप्रविष्टता' हे त्याचे कारण आहे असे पंतप्रधान एका मुलाखतीत म्हणाल्या. ह्या दोन्ही कॉंग्रेसने केलेले ठराव पाहिले, वाचले की अजूनही असे म्हणावेसे वाटते की व्यक्तीपेक्षा पक्ष आणि पक्षापेक्षा राष्ट्र मोलाचे–महत्वाचे जर वाटत असेल तर ही विघटनेची (व पर्यायाने विनाशाची) प्रक्रिया आता थांबविणे अगत्याचे आहे. सौदेबाजीने ऐक्य, भावना, त्याग, निष्ठा वा देशभक्ति विकत घेता येत नाही. मूल्य देऊन फार तर हात 'विकत' घेता येऊ शकतील पण आत्मा खरीदता येणार नाही. शिव्या देऊन सत्याचे रूप पालटता येणार नाही आणि आत्मशून्य, निष्ठाशून्य कलेवराला 'समाजवादी' काठ्या (वा काड्या) टेकवून 'सजीव' करता येणार नाही. ह्या विघटनाला उगाच अभिनिवेशाने 'तात्विक' अधिष्ठान देण्याचे कारण नाही. हे समाजवादी झटके आज आणि आजच येवढ्या आवेगाने कां बरे आले ? मुंबईत झोपडपट्ट्या व कोळणीमाळणी आहेत याचा समाजवादी साक्षात्कार १९६९ मध्येच कां झाला हिंदुस्थानात 'दरिद्री' जनता खूप आहे आणि स्वराज्यात (दुर्दैवाने) अधिकाधिक गरीब होत चालली आहे हे सत्य उमगायला बावीस वर्षे कां बरे लागावीत ? तेव्हा हा सारा संघर्ष मुळातच 'तात्विक' नाही. हा सत्तेचा आणि सत्तेचाच संघर्ष आहे. आणि व्यापक राष्ट्रहित ध्यानी घेऊन, देशाला एकसंध व स्थिर शासनाची गरज आहे हे उमगून ह्या दोन्ही गटांनी कठोर आत्मपरीक्षण केले पाहिजे व गेले चार महिने राष्ट्राचा वेळ, संपत्ती, आणि लोकशाहीने टाकलेला विश्वास व दायित्व यांचा योग्य तो मान राखण्यासाठी 'सत्ते'पेक्षा व्यापक स्तरावर आपले विचार व कृति नेली पाहिजे. अशी मागणी करण्याचा राष्ट्राला नैतिक अधिकार आहे. केवळ राष्ट्रीयीकरण केले की समाजवाद येत नाही. लोकशाहीनिष्ठ, समाजवादी परंपरांना खतपाणी घालून त्या वाढवाव्या लागतात. अन्यथा 'संस्थाने' खालसा होतात आणि नवीन (सहकारी) संस्थाने निर्माण होतात. शिंदे-गायकवाड जातात. त्यांची जागा काही "नवी नावे" घेतात. हा 'सौदेबाज समाजवाद' इथे यावा असे इंदिराजींना वाटत नसावे असे मी गृहीत धरतो.

**–सारस्वत**














# कीर्तीवंत कीर्तिकर

बाल गंधर्वांनी काही मोजक्या कलावंतांवर अमाप प्रेम केले त्यात फोटोग्राफर श्री. मोरेश्वर नारायण ऊर्फ बाबा कीर्तिकर यांचा प्रामुख्याने उल्लेख करायला हवा. बाल गंधर्वांचे आवडते फोटोग्राफर म्हणून त्यांनी लौकिक मिळविला. नाटक रंगीत तालमीला उभे राहिले की त्यावेळी गंधर्व 'मोरूभाऊ'ना फोटो काढायला सांगत असत. त्यातील काही फोटो चित्रशाळा विकत घेत असे तर काही नाट्याचार्य खाडिलकर प्रसिद्ध करीत असत. "बाळ गंधर्वांनी मला अमाप धंदा दिला." असे 'मोरूभाऊ' अभिमानाने सांगतात; "शिवाय गंधर्वांचा व माझा अनेक वर्षांपासून घरोबा होता. माझ्यावर त्यांनी जे अनेक उपकार केले त्याची फेड म्हणूनच मी त्यांच्या नाटकांचे स्वतःहून फोटो काढीत असे."

हल्ली छायाचित्रणाची कला खूप प्रगत झाली आहे. परंतु छायाचित्रकारामध्ये जी एक कल्पकता लागते ती फार थोडयांजवळ असते. त्यामुळेच पूर्वी छायाचित्रणाची कला प्रगत नसतानाही कल्पकतेने त्यात काम करणे ही एक नावीन्यपूर्ण गोष्ट होती. श्री. कीर्तिकर ह्यानी छायाचित्रणात कल्पकता आणली ही त्यांची फार मोठी कामगिरी होय. त्यांनी घेतलेली सगळी छायाचित्रे जितकी रेखीव तितकीच कल्पकतेने ओतप्रोत भरलेली आहेत. श्री. कीर्तिकर यांची कला पिढीजात आहे. त्यांचे वडिल उत्तम मूर्तिकार होते. विशेषतः मंदार गणपतींच्या मूर्ती बनविण्यात त्यांचा हातखंडा होता. ह्याशिवाय छोटी-छोटी कलाकुसर ते सफाईने करीत. त्यांनी साध्या बांबूच्या काठीवर एक माकड कोरलेले आहे. काठीची मूठ म्हणून. ते माकड फळ खाते आहे व फळ घशाखाली ठेवलेले आहे, असा भाव दर्शविलेला आहे, आणि त्याची शेपटी तरी किती हुबेहूब ! लांबच लांब !! असे वाटते की 'हुप्प' करून ते माकड अंगावर येईल ! तीर्थरूपांच्या हातातील ही कला लहानग्या मोरेश्वरच्या हातात उतरली. प्रामुख्याने फोटो काढण्यात मोरेश्वरने आपले कलात्मक अंग प्रकट केले. ही 'घरची विद्या' त्यांनी आता आपली धाकटी कन्या सौ. माणिक हिच्याकडे दिली आहे ! सौ. माणिकताई देसाई ह्या प्रतिभाशाली चित्रकार आहेत. म्हैसूर, पाटणा व त्रिवेंद्रम येथे कलाप्रदर्शनात त्यांना चित्रकलेची सुवर्णपदके मिळाली आहेत.

१९ व्या शतकातील शेवटच्या दशकात मुंबईला परळ येथे श्री. कीर्तिकर ह्यांचा जन्म झाला. ते १८९० साल होते आणि नोव्हेंबर महिन्याची २९ तारीख होती; शिवाय कार्तिक महिन्यातील संकष्टीही त्याच दिवशी होती. स्वतः गणपतीचे दांडगे उपासक असल्यामुळे वडिलांनी 'मोरेश्वर' हे विघ्नहर्त्याचे नाव मुलाला ठेवले खरे परंतु ह्या मुलाला विघ्नांशी लगेच मुकाबला करावा लागला. कारण मोरू अवघा दोन वर्षाचा असतानाच त्यांचे वडिल इहलोक सोडून गेले. पाठोपाठ त्यांच्या मातोश्रींच्या सुखालाही ते पारखे झाले. त्यावेळी त्यांचे वय तीन वर्षाचे होते. लहानग्या मोरूचा सांभाळ त्याचे मामा करू लागले. परंतु अवघ्या एक वर्षानंतरच मामाची सुखाची सावलीही काळाने नष्ट केली. मोठी थोरली इस्टेट सांभाळण्यासाठी व लहानग्या मोरेश्वरची देखभाल करण्यासाठी मुंबईच्या हायकोर्टाने श्री. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर ह्यांना त्यांचे 'पालक' नेमले. सुप्रसिद्ध डॉक्टर श्री. व्ही. एस्. त्रिलोकेकर ह्यांचा हे सख्खे बंधु होते.

मराठी पाच पुस्तके व इंग्रजी दोन पुस्तकांपर्यंतच त्यांचे शिक्षण झाले असले तरी श्री. कीर्तिकर उत्तमपणे इंग्रजी बोलू शकतात. संस्कृतमधील जाडया ग्रंथांचे ते सफाईने वाचन करू शकतात. 'आर्ट स्कूल'मध्ये त्यांचे कलाशिक्षण झाले. बुद्धी इतकी तल्लख की एकदा सांगितलेली गोष्ट ते कधीही, केव्हाही बिनचूक सांगतात. विशेषतः जन्मकुंडल्या ! आज वयाच्या ऐंशीव्या वर्षीही त्यांची स्मरणशक्ती तीव्र आहे. अजूनही ५०-७५ वर्षापूर्वीच्या घटना ते तपशीलवार सांगतात. तन आणि धन ह्याबाबतीतही ते ह्या वयात समृद्ध आहेत. एवंच खऱ्या अर्थाने कीर्तिकर राजयोगी आहेत !

फोटोग्राफीमध्ये कीर्तिकरांना एकंदर १९ सुवर्णपदके मिळाली. १९१३ साली पूना मेडिव्हल आर्ट सोसायटीचे सुवर्णपदक त्यांना मिळाले. १९१६ साली रवींद्रनाथ टागोर ह्यांच्या पोर्ट्रेटबद्दल त्यांना राजपुताना फाईन आर्ट सोसायटीने सुवर्णपदक बहाल केले. ह्याच वर्षी गिरसप्पा धबधब्याचे फोटो काढण्यासाठी व्हाइसरॉयचे खास फोटोग्राफर म्हणून कीर्तिकर त्यांच्याबरोबर तेथे गेले. त्यावेळी लॉर्ड वेलिंग्टनही त्यांच्याबरोबर होते. फोटो अप्रतिम निघाले. इतके की म्हैसूर सरकारने त्या फोटोबद्दल त्यांना सुवर्णपदक दिले. ह्यापूर्वी म्हैसूरचे फोटोग्राफीचे सुवर्णपदक कोणालाही मिळाले नव्हते व नंतरही कोणाला मिळालेले नाही ! ह्याच सुमारास त्यांच्या दुसऱ्या एका फोटोबद्दल त्यांना कलकत्ता आर्ट अकादमीचे ब्रॉंझ मेडल मिळाले. १९२५ साली बॉम्बे आर्ट सोसायटीने प्रिन्सिपॉल सालोमन










अनुक्रमणिका

ह्यांच्या फोटोबद्दल कीर्तिकरांना रौप्यपदक दिले. ह्याच वर्षी मद्रास-मध्येही त्यांना स्पेशल मेडल मिळाले.

लोकमान्य टिळकांचा उघड्या माथ्याचा (पगडीविना) फोटो काढून त्यांनी वाहवा मिळविली. दादाभाई नवरोजी, ॲनी बेझंट व फिरोझशहा मेहता ह्यांचे भव्य स्वरूपातले फोटो आपण जे आज बघतो ते मूळ फोटो कीर्तिकरांचे आहेत. त्यांच्या काही गाजलेल्या फोटोच्या कुळकथा मजेशीर आहेत.

श्री. कीर्तिकर ह्यांची लोकमान्यांशी भेट शिल्पकार फडके ह्यांनी घडवून आणली. ही भेट लोकमान्यांच्या घरीच झाली. त्यावेळी बळवंतराव लेखन करीत होते. त्यांचा फोटो काढण्याचा आपला मनोदय कीर्तिकरांनी प्रकट केला. लोकमान्यांच्या आप्तांनी फोटोसाठी तयारी सुरू केली. पगडी, उपरणे, काठी वगैरे आणण्यात आले. हे पाहून कीर्तिकर म्हणाले, "मी लोकमान्यांचा ह्याच वेषात उघड्या डोक्याचा फोटो घेणार आहे. कारण त्यांचे सगळेच फोटो पगडीधारी आहेत. तेव्हा हा वेगळा फोटो घेण्याचे मी ठरविले आहे."

असा फोटो घेण्याची मूळ कल्पना "करमणूक", "मनोरंजन" मासिकांचे श्री. विठ्ठल शिवाजी नाडकर्णी ह्यांची होती. इतकेच नव्हे तर हा फोटो प्रसिद्ध न करण्याचा सल्लाही त्यांनी कीर्तिकरांना दिला. पुढे दहा वर्षानंतर लोकमान्यांचे देहावसान झाल्यानंतर त्याच दिवशी हा फोटो लगेच "केसरी"कडे प्रसिद्धीसाठी कीर्तिकरांनी पाठविला. दुसऱ्या दिवशी लोकमान्यांचा हा 'आगळा' फोटो "केसरी"त प्रसिद्ध झाल्यावर, तो फोटो पाहून सबंध महाराष्ट्र दिङ्मूढ झाला. इतकेच नव्हे तर ह्या फोटोसंबंधी व श्री. बाबा कीर्तिकरांबद्दल साहित्यसम्राट केळकर ह्यांनी "केसरी"मधून खास गौरवोद्गार काढले. हाच फोटो नंतर "गीतारहस्य" ग्रंथात प्रसिद्ध करण्यात आला. ह्या फोटोच्या प्रती पाठविण्यासाठी श्री. कीर्तिकर ह्यांना हजारोंनी पत्रे आली. परंतु त्यांनी एकालाही प्रत पाठविली नाही. कारण 'दफनखा मत खाना' असे एका अवलियाने त्यांना सांगितले होते व त्यांना ते पटले होते.

श्री. कीर्तिकर ह्यांनी ॲनी बेझंट ह्यांचा काढलेला फोटो जगभर गाजला. बाईंचा फोटो घेण्यासाठी तोपर्यंत कोणी धजावले नव्हते; कारण पाश्चिमात्य फोटोग्राफरने बाईंच्या काढलेल्या फोटोशी त्याची नाहक तुलना होईल अशी भीती होती. परंतु कीर्तिकरांनी बाईंच्या नकळत त्यांचा फोटो घेतला त्यामुळे चेहऱ्यावरील नैसर्गिक भाव त्या फोटोत उतरले व तो फोटो बोलका झाला. खुद्द बेझंट बाईंना हा फोटो आवडला व त्यांनी परदेशी पाठविण्यासाठी ह्या फोटोच्या एक डझन प्रती विकत घेतल्या. हा फोटो पाहून श्री. रवीन्द्रनाथ टागोर इतके खूष झाले की शिल्पकार करमरकरांना बरोबर घेऊन ते कीर्तिकरांना गिरगांवातील त्यांच्या स्टुडिओत मुद्दाम जाऊन त्यांना भेटले.

ह्या फोटोची कहाणीही रंजक आहे. श्री. कीर्तिकर ह्यांची कल्पकता ह्या गोष्टीवरून समजते. १९१४ साली वेसाव्याला डॉ. दादाभाई नवरोजी (९० वर्षांचे त्यावेळी ते होते) ह्यांच्या घरी बाई होमरूल कन्सल्टेशनसाठी गेल्या होत्या. हॉलमध्ये बाईशी स्वतः दादाभाई चर्चा करीत होते. शिवाय मोरारजी गोकुळदास, रतनसी धरमसी, जमनादास द्वारकादास व नरोत्तम मोरारजी अशा बड्या असामीही तेथे होत्या. कीर्तिकरांनी दादाभाई व बेझंटबाईंचे एकत्र असे दोन फोटो घेतले. मग पुन्हा ते फोटो काढू लागले तेव्हा इतरांनी विचारले "काय करतोस ?" तेव्हा त्यांनी सांगितले, "मघाशी कॅमेरा हलला म्हणून पुन्हा फोटो घेतो." परंतु फोटो घेतला मात्र दादाभाईंच्या शेजारी बसलेल्या बेझंटबाईंचाच ! दुसऱ्या दिवशी हा फोटो ठाकुरद्वार येथील थिऑसॉफिकल लॉजमध्ये प्रसिद्ध झाल्यावर त्याचा खूप गवगवा झाला. ह्या फोटोला "Sitting in a Basket Chair" असे नाव कीर्तिकरांनी दिले. ह्या फोटोच्या हजारो प्रती संपल्या. Baby's Annual ह्या जगप्रसिद्ध मासिकातही हा फोटो प्रसिद्ध झाला. ह्या फोटोमुळे कीर्तिकर धनवंत आणि कीर्तिवंत झाले !

प्रिन्सिपॉल सॉलोमन ह्यांच्या फोटोबद्दल कीर्तिकरांना १९२५ साली बॉम्बे आर्ट सोसायटीचे रौप्यपदक मिळाले. सॉलोमन हे त्यावेळी सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टचे प्रिन्सिपॉल होते. सुप्रसिद्ध चित्रकार माधवराव धुरंधर ह्यांच्याबरोबर कीर्तिकर सॉलोमन ह्यांना भेटायला गेले तेव्हा ओळख होताच, I want my Photograph just now असे ते कीर्तिकरांना म्हणाले. कीर्तिकरांनी कॅमेरा सरसावला. पॅलेट हातात घेऊन सॉलोमन ह्यांनी 'पोज' दिली व फोटो काढायला सांगितला. तेव्हा कीर्तिकर त्यांना म्हणाले "मी आपला फोटो मघाशीच काढला आहे ! दुसऱ्या दिवशी आपला फोटो पाहून सॉलोमन खूष झाले व धुरंधरांना म्हणाले, "He is not a photographer, he in an artist." त्यावेळी धुरंधरांनी त्यांना सांगितले की कीर्तिकर आर्ट स्कूलमध्ये शिकलेले आहेत. हा फोटो १९२४ मध्ये घेण्यात आला.

फोटोग्राफर कीर्तिकर अध्यात्माकडे वळतील असे त्यावेळी कोणाला वाटले नव्हते. परंतु १९३० नंतर त्यांनी फोटोग्राफीचा व्यवसाय सोडला व मुळात आवड असलेल्या अध्यात्माकडे ते वळले. ह्या क्षेत्रात त्यांनी मन तादात्म्य करून जी साधना गेल्या ४० वर्षांत केली आहे ती मनोनिग्रहाचे एक यशोदीप ठरावे. बाबा कीर्तिकर म्हणून ते ओळखले जाऊ लागले. पूजाविधान, मंत्रविधान व ज्योतिर्विधान ह्यात त्यांनी असामान्य यश मिळविले.

आपल्या बहुविध जिज्ञासूवृत्तीमुळे श्री. कीर्तिकर ह्यांनी अनेकांशी संबंध ठेवला. अनेकांनी त्यांना अलोट प्रेम दिले. रवीन्द्रनाथ टागोर, दादाभाई नवरोजी, लोकमान्य टिळक, तात्यासाहेब केळकर, नाट्याचार्य खाडिलकर, शिल्पकार करमरकर, फडके, चित्रकार धुरंधर, केतकर, नटसम्राट बाल गंधर्व, बाबुराव पेंटर, गुळवणी महाराज, आदि विविध क्षेत्रातील नामवंत व्यक्तींचा कीर्तिकरांशी घनिष्ट संबंध आलेला आहे.

८० व्या वर्षात पदार्पण करताना श्री. कीर्तिकर म्हणतात, "माझ्या आयुष्याचे यश माझ्या शुद्ध आचरणाला आहे. मी उपासनेला फार मानतो. कोणत्याही क्षेत्रात गुरूने घालून दिलेले आदर्श पाळले तर अपयश येत नाही असा माझा अनुभव आहे." ह्यामुळेच आज धनाने, मनाने, प्रकृतीने, सर्वस्वाने श्री. कीर्तिकर सुखी आहेत; समाधानी आहेत, निरोगी आहेत. श्री. कीर्तिकर शतायुषी होवोत हीच शुभेच्छा !








# 'कलासाधक' गुर्जर



काही काही माणसे देवाघरचे देणे व लेणे घेऊन जन्म घेतात. ते देणे वा लेणे कधी सुरांचे असते, कधी रंगांचे असते, कधी शब्दांचे असते, कधी रूप-गुणांचे असते. तसा रिक्त हस्ते तर कुणीच येत नाही. तर-तम असते इतकेच. पण ह्या देवाघरच्या लेण्याला पैलू पाडून, त्याला सुयोग्य कोंदण देण्याचा प्रयत्न करणाऱ्या साधकांना कलाकार म्हणून यश-कीर्ति मिळते. देणाऱ्याचे 'देणे' व घेणाऱ्याचे 'घेणे' सार्थकी लागते. त्यातून ह्या सुंदर दुनियेला सुंदर कलाकृतींची भेट मिळते.

महाराष्ट्राचे एक नामवंत व गुणी चित्रकार श्री. विष्णु सीताराम गुर्जर (परिचय—व्ही. एस्. गुर्जर म्हणूनच अधिक) यांच्याबाबत हेच म्हणता येईल. कलाकार जन्मावा लागतो, प्रतिभावंत घडतात ते ईश्वरी इच्छेने आणि संकेतानुसार असे म्हटले जाते. 'व्ही. एस्. गुर्जर' नामक कलाकाराचा जन्म २० जानेवारी १९१० ला झाला असला आणि नुकतीच त्यांनी साठी सुरू केली असली तरीही 'व्ही. एस्. गुर्जर' या नावाला व त्या नामधारी माणसाच्या कलेला 'वय' नाही, 'जरा' नाही. पण माणसाला वय असते आणि त्या माणसाच्या वयाचा 'लौकिक' विचार त्याच्या 'अलौकिक' कलेच्या संदर्भातसुद्धा सुटत नाही. सोडून चालत नाही. कारण कुठलाही कलाकार झाला तरी तो अखेर माणूसच असतो. आणि त्याच्यातल्या 'अलौकिका'च्या संदर्भात त्याच्यातल्या 'ऐहिका'चाही विचार दुनियेला करावा लागतो.

'व्ही. एस्. गुर्जर' यांनी कलासाधना करीत करीत ऐहिकाची साठी पूर्ण केली आणि ती पूर्ण करीत असताना एकीकडे कला मात्र 'तरुण' राखली, 'सजीव' राखली, 'बोलकी' राखली, 'प्रत्ययकारी' राखली ह्याबद्दल प्रथम त्यांचे मी मन:पूर्वक अभिनंदन करतो.

व्ही. एस्. गुर्जर ह्यांनी कलेची ही जी साधना केली ती 'दे ऑल्सो रॅन' ह्या आत्मसंतुष्ट व अल्पसंतुष्ट वृत्तीने केली नाही आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपली जीवननिष्ठा वा कार्यक्षेत्र प्रथमपासून ठरवून घेऊन ते निष्ठेने साधना करीत राहिले. 'चित्रकार' गुर्जर हा 'अपघात' नाही, तर ती एक निश्चित स्वरूपाची श्रद्धा-निष्ठा आहे. गुर्जर प्रयत्नशील राहिले आणि वयाच्या अठराव्या वर्षीच 'जी. डी. आर्ट' झाले. जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधूनच तो डिप्लोमा त्यांनी संपादन केला. गुर्जरांनी आपले बाल्य पुण्यात घालवले असले तरी वयाच्या चौदाव्या वर्षीच ते मुंबईत आले. आणि त्यांचे नंतरचे शिक्षण व कलाशिक्षणही मुंबईतच झाले. पण 'कला' ही त्यांची निष्ठा असल्याने व कलासाधकाला आवश्यक असलेली अतृप्ती त्यांच्यात असल्याने आर्ट स्कूलमध्ये ते चमकले. ॲडव्हान्स परीक्षेत त्यांनी पहिला क्रमांक पटकावला आणि स्कूल ऑफ् आर्ट सोडीपर्यंत त्यांना शिष्यवृत्ती लाभली. आर्ट स्कूलच्या काळात त्यांनी विविध स्पर्धांत पहिल्या क्रमांकाची पारितोषिके पटकावली. डॉली करसेटजी पारितोषिक (रु. ६००) व रौप्यपदकही त्यांनी पटकावले. पण स्पर्धांतून व विविध प्रदर्शनातून पारितोषिके मिळविण्याची परंपरा आर्ट स्कूल सुटल्यानंतरही खंडित झाली नाही. तशी त्यांनी ती होऊ दिली नाही हे गुर्जरांचे वैशिष्टच ! त्यानंतरच्या काळात त्यांनी अनेक सुवर्ण, रौप्य व ब्राँझ पदके मिळविली व रौप्य चषकही संपादन केले. महाराष्ट्रातच केवळ नव्हे तर कलकत्ता ॲकॅडमी ऑफ आर्टची तैलचित्रांसाठी असलेली सुवर्णपदके त्यांनी तीनदा मिळविली. अमृतसर येथील इंडियन ॲकॅडमी ऑफ आर्टची तैलचित्रांसाठी असलेली सुवर्णपदके त्यांनी सतत दोन वर्षे (१९३९/४०) पटकावली. तर रौप्यपदके (पेस्टल्स् करिता) त्यांनी तीन वेळा प्राप्त केली व कलेचा झेंडा अमृतसरी रोवला. सिमला फाइन आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनात (१९३७-३९) त्यांनी पेस्टल्स् व तैलचित्रांसाठी दोन ब्राँझ पदके संपादन केली. कर्नाटक फाइन आर्ट सोसायटी (सुवर्णपदक-पेस्टल्स्) कोल्हापूर आर्ट सोसायटी (रौप्यपदक-पेस्टल्स्) महाराष्ट्र चित्रकार मंडळ पुणे, आर्ट सोसायटी ऑफ इंडिया, बॉम्बे आर्ट सोसायटी, म्यु. कॉर्पोरेशन, म्हैसूर दसरा प्रदर्शन आदि ठिकाणी त्यांनी तैलचित्रे व पेस्टल्स् यावर अनेक रौप्य, ब्राँझ व सुवर्ण पदके मिळवली व विक्रम म्हणजे बॉम्बे आर्ट सोसायटीच्या पुणे येथे भरणाऱ्या प्रदर्शनात 'पेस्टल्स्'साठी १९३५ ते १९४१ ह्या सात वर्षांत सतत पहिल्या क्रमांकाची रोख बक्षिसे संपादन केली आहेत. त्यांची प्रदर्शनातील पेस्टल्स्, तैलचित्रे इटली, अमेरिका, आणि रशियासारख्या देशातील 'आर्ट गॅलरी'-साठी विकत घेतली गेली व गुर्जरांची कला 'वैश्विक' स्तरावरही विक्रमी ठरली. भारतातीलही काही आर्ट गॅलरीत त्यांची तैलचित्रे आहेतच. दिल्ली येथील इंपिरियल सेक्रेटरिएटसाठी त्यांनी काही 'म्यूरल्स्'ही १९३१ साली दिले. रविउदय प्रेसमध्ये हेड आर्टिस्ट म्हणून नोकरी केली व १९३८ साली त्यांनी स्वतंत्र कलालय (स्टुडियो) काढले असून व्यवसाय म्हणून ते आज काम करीत आहेत. सत्यदर्शी (रिॲलिस्टिक) कलेच्या संदर्भात त्यांनी काही हिरीरीचे व जिद्दीचे लेखनही केले आहे. कलाविषयक अन्याय सहन न करण्याची व त्यासाठी आवश्यक तर ब्रश बाजूला ठेवून लेखणीही हाती घेण्याची कलानिष्ठ व लढाऊ वृत्ती गुर्जरांत आहे—साठीतही आहे—ही गोष्ट मला महत्त्वाची वाटते. अशा कलाकाराला व त्याच्या कलेला साठी हे वरदानच ठरेल. गुर्जर यांना अनेक 'शतकी' विक्रम करण्याची प्रेरणा त्यांची ही 'साठी' देवो आणि त्या विक्रमांसाठी आवश्यक असलेले आयुरारोग्य त्यांना लाभो अशी सदिच्छा व्यक्त करतो.

—आदित्य





अनुक्रमणिका

(पृष्ठ ८ वरून–सत्ता)

राजेशाही असो की लोकशाही असो, सत्ता हस्तगत करायचे मार्ग चारच: साम, दाम, दंड व भेद. सत्ययुग गेले व त्याबरोबर 'साम' या प्रकाराने सत्ता मिळण्याची आशादेखील लुप्त झाली. आजच्या रामायणात रावणाचे कंदन करून आलेल्या विजयी रामास अयोध्येत पुन्हा भरताशी लढावे लागले असते ! नेहरूनंतर शास्त्रीजी गादीवर आले ते या 'साम' प्रकाराने अशी पुष्कळांची समजूत आहे. त्यांच्यामागे सिंडिकेटची शक्ती होती हे सत्य विसरता कामा नये. कोरीयात अमेरिकेने आपले सैनिक मागे घेतले. याचे कारण, अमेरिकेस आपला आशियातील पराभव डोळ्यासमोर दिसू लागला होता ! १९६२ साली चीनने याच पद्धतीने अमेरिकन अस्त्रे भारताच्या भूमीवर येत असल्याचा वास लागल्यावर एकतर्फी युद्धबंदी जाहीर केली व यशवंतरावांना "हिरो ऑफ द डे" बनविले. कविलेखकांनी 'सह्याद्रि हिमालयाच्या मदतीस धावला' ही मध्यवर्ती कल्पना उचलून त्यावर कल्पनांचे मनोरे रचले ! लोकशाहीत 'दामा'सारखा रामबाण उपाय नाही. निवडणुकीच्या युद्धात दाम नसेल तर शहाण्याने उमेदवार म्हणून आपले नाव जाहीर करू नये. विधानसभा, राज्यसभा किंवा लोकसभा येथे मिळणारा पगार या सभासदांना आठवडाभरसुद्धा पुरा पडत नाही एवढे सांगितले की पुरे. साऱ्या लाचलुचपतीचे मूळ येथे आहे. सत्तेचे लग्न सामर्थ्याशी लावले आहे. पैशाच्या सामर्थ्याची कल्पना वेड्या लोकांनादेखील असते. शहाण्यांविषयी काय लिहावे ?

सत्ता प्राप्त करण्यात सत्ताभिलाषी पुढाऱ्यांनी दंडनीतीचा वारंवार उपयोग केलेला आढळतो. श्रीकृष्णाने पूतना मावशीचे, कालिया नागाचे, कंस मामाचे, राजा बळीचे किंवा जरासंधाचे कंदन केले नसते तर तो साधा गवळ्याचा पोरच राहिला असता. रामास दंडकारण्यात राक्षसांविरुद्ध लढावे लागले ते आर्यांची सत्ता आर्यावर्तात सुरक्षित करण्यासाठीच. मुसलमानांनी सत्ता मिळविण्यासाठी अमानुष क्रौर्य वापरून एक नवा पायंडा इतिहासात पाडला आहे. औरंगजेबाने आपल्या पित्यास आग्र्याच्या तुरुंगात डांबले व भावांचा निकाल लावला. अशी पाशवी नीति साधारणत: हिंदू राजांनी वापरलेली दिसत नाही. अर्थात् नारायणराव पेशव्याचा आनंदीबाईने गारद्यांच्या हातून केलेला खुनाचा अपवाद तो नियम सिद्ध करतो. मुसलमानी सत्ताधीशात आपल्या स्पर्धकांना ठार मारून आपली सत्ता निरंकुश करण्याचा प्रघात सर्रास दिसून येतो.

हिंदूंच्या धर्मग्रंथातून राजनीती व्यवहारनीतीहून वेगळी असावी असा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ, हिंदू राजांनी रामचंद्राप्रमाणे एकपत्नीव्रत पाळावे हे खरे असले तरी दुसऱ्या देशांशी रक्ताचे नाते जोडण्यासाठी त्यांनी जर त्या देशाची राजकन्या आपल्या घरात आणली तर ते पाप ठरणार नाही, उलट ते धर्मकृत्यच ठरेल. हिंसेच्या बाबतीत महर्षि व्यासांनीच लिहून ठेवले आहे, "शस्त्रेण रक्षिते राष्ट्रे, शास्त्रचिंता प्रवर्तते।" दंडशक्ती समाजसुधारणेला या ना त्या रूपात आवश्यक ठरली आहे. मनुस्मृती सांगते, "जगामध्ये कोणत्याही बलाधिष्ठित अनुशासनाचा धाक नसताना स्वयंप्रेरणेने विशुद्धपणे वागणारा मनुष्य अत्यंत दुर्लभ आहे. वस्तुत: सर्व लोक दंडाच्याच सामर्थ्याने नियंत्रित असतात." जर धर्मच शिल्लक राहणार नसेल तर नीती व विद्या

यांचा उपयोग काय ? धर्म व सत्ता स्थावर राहण्यासाठी दंड आवश्यक आहे.

एकदा सामान्य नीती व राजनीती यातील भेद समजला की "King can do no wrong" या वचनातील गर्भितार्थ उकलण्यास अडचण पडणार नाही. म्हणूनच राजनीतीत भेद हा क्षम्य आहे. सत्ता प्राप्त करून घेण्यासाठी भेदनीतीचा अवलंब प्रत्येक सत्ताधीशाने यथेच्छ करून घेतला आहे. "Divide and Rule" या तत्त्वाचे केवळ इंग्रजांनाच सारे श्रेय द्यावयास नको, हे तत्त्व थेट रामायण, महाभारत काळापासून ते आजच्या काँग्रेसी राजवटीपर्यंत सारे सत्तापिपासू लोक उपयोगात आणीत आहेत. पेशव्यांच्या काळी भेदनीती शत्रूत वापरण्याऐवजी राघोबादादाने आपल्या आपल्यातच उपयोगात आणून पुण्याचे सामर्थ्य खच्ची करण्याचा प्रयत्न केला. पेशवे मोगल असते तर राघोबास केव्हाच "वर" पाठविण्यात आले असते. भेदनीतीचा ब्रिटिशांचा वारसा नेहरूंनी चांगला चालविला. मोठ्या शिताफीने त्यांनी आपले प्रतिस्पर्धी नामोहरम केले.

समाजवादी जीवनाचा स्वीकार करून त्यांनी जयप्रकाश वगैरे प्रतिस्पर्ध्यांचे कंबरडेच मोडले. मुस्लीम लीगच्या मागण्या मागणारे सैयद महमूद, प्रो. कबीर, फकरुद्दीन अहमद व अहमद कोया यांना उदार राजाश्रय देऊन त्यांनी लीगच्या स्वतंत्र अस्तित्वाचे कारणच उरू दिले नाही. पट्टम् थाणू पिल्ले यांना राज्यपाल बनवून केरळातील एक प्रतिस्पर्धी आपोआप खलास केला तर अशोक मेहता यांस प्लॅनिंग कमिशनमध्ये घेऊन समाजवादी पक्षाच्या शिडातील हवाच काढून घेतली.

सत्ता मिळविण्यासाठी ज्या शस्त्रांचा वापर करावा लागतो त्याच शस्त्रांचा वापर मिळालेली सत्ता टिकवून धरण्यासाठी होतो. एकदा का काँग्रेस निवडून आली की आज डी. एम. के. शी, उद्या अकाली दलाशी, परवा मुस्लीम लीगशी, तेरवा डाव्या गटाशी या विजेत्यांची शय्यासोबत सुरू होते. जेथे ही सामनीती फसते तेथे विरोधकांना विकत घेण्याचा धंदा सुरू होतो. या युक्तीमुळे पं. नेहरूंना सुरवातीस डॉ. श्यामाप्रसाद मूखर्जी, डॉ. खेर व लोहिया यांच्याशिवाय जालीम विरोधाचा त्रास फारसा झालाच नाही. हिंदू महासभा व नंतर जनसंघ या दोन पक्षांवर त्यांनी दंड व भेदनीतीचा अवलंब करून हे पक्ष जवळजवळ मृतवत् करून सोडले. संघावर बंदी घातली व हिंदू महासभेच्या सावरकरांना गोडसे खटल्यात गोवून उतार वयात कोर्टात उभे केले ! हिंदू महासभा व संघ यांचे मनोधैर्य अशा रीतीने दहा वर्षे खच्ची केल्यावर पंडितजींना राजकीय क्षेत्रात रान मोकळे होते. जातीय वादाविरुद्ध प्रचाराची आघाडी उघडून त्यांनी निवडणुकीत १९५२ नंतर महासभा-अकाली दल-निर्वासित या भावी Axis चा संभाव्य विजय मोठ्या हिकमतीने उखडवून टाकला. दुर्दैवाने हिंदू सभेजवळ पैशाचे पाठबळ नाही, सतत विरोधी प्रचारामुळे चांगल्या माणसांचा पाठिंबा नाही, सरकारी नोकऱ्यात वाव देणारे नाहीत या दंडनीतीमुळे व आपल्या खास लोकांच्या भेदनीतीमुळे संघ व महासभा यांचा संभाव्य सहकार पंडितजींनी तोडून टाकला. समाजवाद्यातही आणि साम्यवाद्यातही अशीच फूट पाडून ठेवली व आपली अनियंत्रित हुकूमशाही सतत वीस वर्षे लोकशाहीच्या आवरणाखाली चालविली.

ही राजकीय चलाखी नेहरूंच्या वारसांना साधली नाही. त्यांना नेहरूंची उंची, व्यक्तीमत्व व बुद्धी कमी पडली. म्हणून नेहरूनंतर केंद्र सरकार दिवसेंदिवस क्षीण होत चालले आहे व प्रत्येक राज्य-सरकार आपण स्वतः स्वतंत्र सुलतान असल्याच्या थाटात वागत आहे. या राज्यांतून पूर्वी व्यक्तिमहात्म्य असे. नेहरू त्यांच्या सोयीनुसार हे व्यक्तिमहात्म्य वाढवीत किंवा खलास करीत. उदाहरणार्थ, स्वामी रामानंद तीर्थांचे नाव हैदराबादेच्या पोलीस कारवाईत केवढे प्रसिद्ध होते. त्यांचे कार्य होताच स्वामी रामानंद तीर्थांचे नाव राजकारणात जे लुप्त झाले ते कायमचेच. आज व्यक्तींचे राजकारण जाऊन गटाचे राजकारण आले आहे. व्यक्तीस मोठे करणे वा मोडणे सोपे असते. गटातील प्रत्येक घटकास खूष राखणे अवघड काम आहे. जगजीवनराम किंवा चव्हाण यांच्यावरील जबाबदारी आज जास्तच किचकट होऊन बसली आहे ती याच कारणामुळे.

खुद्द नेहरू आज असते तरी हैराण झाले असते. या राजकीय वारांगनेच्या तत्वज्ञानाने–to please all by saying, I am better, I am cheaper." राजकारण फक्त स्वार्थाने भरलेले आहे. आपापला स्वार्थ साधला की तुम्ही कोण नि आम्ही कोण ? हा शहाणपणा राजकीय पुढाऱ्यास सुचतो. तो लगेच मोठी तत्त्वे बोलू लागतो, त्यागाची, सेवेची भाषा वापरू लागतो. सर्वांचा स्वार्थ शेवटी 'पैसा' व 'सत्ता' यावरच केंद्रित झालेला असतो. प्रत्येकास सरकारी खर्चाने–स्वतःचा पैसा जो खर्चेल तो राजकारणी कसला–खूष ठेवण्याची तारेवरची कसरत खेळून राजकीय सत्ताधीशाची शारीरिक व मानसिक तब्येत कशी बिघडत नाही ते देव जाणे; कदाचित ही कसरतच त्या सत्ताधीशांसाठी 'टॉनिक' असावे.

### सत्ता–दुधारी शस्त्र

सत्ता हे दुधारी शस्त्र आहे. सत्तेचा उपयोग फार जबरदस्त होऊ शकतो. चाणक्य आपल्या अर्थशास्त्रात लिहितो, "कारणप्रसंगी नीट चौकशी करून दंडाचा उपयोग केल्यास प्रजा धर्म, अर्थ व काम या विविध पुरुषार्थसिद्धीने संपन्न होते." राजर्षि मनूने लिहिले आहे, "सर्व जग अराजकाच्या अनियंत्रित परिस्थितीत भयकंपित होऊन पळत असता सर्वांच्या संरक्षणासाठी परमेश्वराने राजाला निर्माण केले व या राजासाठीच सर्व प्राणीमात्रांचे संरक्षण करणारा ब्रह्मतेजोमय धर्मरूपी दंड परमेश्वराने स्वतःपासूनच निर्माण केला." या दंडशक्तीच्या जोरावर पृथ्वीच्या पाठीवर बरीच राष्ट्रे संपन्न व समृद्ध झाली असून त्यांचे दंडधारी शास्ते व सत्ताधीश अमर झाले आहेत. त्यांनी प्रजेसाठी, समाजासाठी जर हितकारक कार्ये करून






जनहित व राष्ट्रहित साधले तर ते अमर होतात. सत्तेच्या राजकारणात दुर्दैवाने नीतीचे पथ्य कमी पाळले जाते. धर्म शिकविणाऱ्यांमध्ये नकळत घुस्सा केला जातो व त्यांचे शिरकाण होते ! त्यांची जागा 'होयबा' घेतात व ह्यातून गटबाजी निर्माण होते. सत्तेच्या राजकारणात गटबाजी व कटबाजी या एकाच नाण्याच्या दोन बाजू ठरतात.

सध्याचा कॉंग्रेसचा जमाना गटबाजी व कटबाजीचा आहे. दिल्ली त्यासाठी गेली कित्येक शतके महशूर आहे. मात्र सध्या त्यास उत आला आहे. इंदिराबाईंनी साम, दाम, दंड व भद नीती वापरून जुन्या सहकाऱ्यांना डच्चू देऊन नव्या सहकाऱ्यांना आपल्या सामर्थ्याने उचलून धरून आपला गट (याने इंडिकेट) प्रबळ करण्याचे धोरण आखले आहे. त्यासाठी प्रत्येक मंत्र्यांच्या मागे बाईंनी आपला एक माणूस लावून दिला आहे. मोरारजींच्या मागे प्रकाशचंद्र शेठींना लावले, जयसुखलाल हाथी मोरारजींचे म्हणून भगवत झा त्यांच्या मागे जोडण्यात आले. सरोजिनी महिषी निजलिंगप्पांकडल्या म्हणून त्यांना करणसिंगाच्या खात्यात जोडून पूर्वाश्रमीच्या साम्यवादी कार्यकर्त्या नंदिनी सतपथींना बाईंनी आपल्या दिमतीस घेतले. रामसुभग सिंह हे पाटीलबुवांचे म्हणून त्यांच्यामागे परिमल घोष आणि रोहनलाल चतुर्वेदी या जोडगोळीची योजना झाली. त्रिगुण सेन यांना शिक्षण मंत्रीपदावरून काढून पेट्रोकेमिकलसकडे त्यांची रवानगी झाली व जगन्नाथ राव व डी. आर. चव्हाण त्यांच्या मागे लावून दिले. के. एल. राव हे आंध्राच्या संजीव रेड्डीची बाजू घेतील व आपल्यास विरोध करतील म्हणून सिद्धेश्वर प्रसाद यांना त्यांच्या मागे लावून दिले. चव्हाणांच्या मागे विद्याचरण शुक्ल होतेच ! दिनेशसिंग परराष्ट्र मंत्री, भगत हे परराष्ट्र व्यापार मंत्री व मुख्य म्हणजे गुजराल यांच्याकडे या भानगडींसाठी सर्वात महत्त्वाचे नभोवाणी खाते—बाई हुषार नाहीत असे कोण म्हणेल ?

(पूर्वार्ध)

---

(पान १० वरून—माडखोलकर)

त्यांनी भंगलेले देऊळ, शाप, कांता, डाकबंगला, दुहेरी जीवन, नवे संसार, नागकन्या, स्वप्नांतरिता, अनघा, अरुंधती, चंदनवाडी, रुक्मिणी, मुखवटे, प्रमद्वरा व सत्यभामा इत्यादि कादंबऱ्या लिहिल्या. मुक्तात्मा ही त्यांची जशी पहिली कादंबरी तशी सत्यभामा ही त्यांची अलीकडची नवी (जुलै १९६८) कादंबरी. त्यांच्या पहिल्या कादंबरीत जशी राजकीय चळवळीची छाया दिसून येते त्याप्रमाणेच सत्यभामेतही राजकीय घडामोडींचे प्रतिबिंब स्वच्छपण पडलेले आहे. त्यांच्या शाप, डाक बंगला, दुहेरी जीवन, नागकन्या वगैरे कादंबऱ्या स्त्रैण अन् हीन अभिरुचीच्या असा आरोप त्यावेळी टीकाकारांनी केला असला तरी त्या काळी त्या कादंबऱ्या अतिशय लोकप्रिय झाल्या होत्या ही गोष्टही नाकारता येणार नाही. त्यांच्याबरोबर फडके—खांडेकर हे गाजलेले कादंबरीकार स्पर्धेत असतानाही माडखोलकरांच्या कादंबऱ्या आपल्या भाषावैशिष्ट्याने अन् एक

प्रकारच्या निराळयाच ढंगाने खुलून दिसल्या ही गोष्टही कबूल केलीच पाहिजे.

## शारदामंदिराची अन्य दालनेही जिंकली

कादंबरीखेरीज दोन लघुकथा संग्रह, एका निर्वासिताची कहाणी अन् दोन तपे ही आत्मवृत्ते, सुभाषवाद नि विष्णुशास्त्री चिपळूणकर हे प्रबंध, अमेरिकेचे प्रवासवर्णन आणि परामर्ष, विला-पिका, माझे आवडते लेखक, माझे आवडते कवि, माझे लेखनगुरु, निर्माल्य, व्यक्तिरेखा, स्वैरविचार, आव्हान, माझी नभोवाणी, साहित्यशलाका इत्यादि टीकाग्रंथ आणि देवयानी अन् उर्वशी ही दोन नाटके मिळून सुमारे चाळीसच्या वर माडखोलकरांची ग्रंथ-संपदा आहे. ती विपुल आहे. तशी वाचनीयता हा तिचा खास गुण आहे. आपले गुरु कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या टीकेचा आदर्श डोळयांसमोर ठेवूनच त्यांनी सारे टीकालेखन केले. वैयक्तिक द्वेषाने त्यांची टीका कधी डागळलेली नाही. अर्वाच्य अन् अनुदार टीका-पद्धतीपासून ते सदैव अलिप्तच राहिलेले आहेत. आणि म्हणूनच कादंबरीकार या नात्याप्रमाणेच टीकाकार म्हणूनही त्यांचे आगळे स्थान मराठी वाङ्मयात खुलून दिसते. त्यांचा 'माझे आवडते कवि' हा टीका ग्रंथ मराठी वाङ्मयाचा एक अमोल ठेवा आहे यात शंका नाही. यशवंत, यशोधन, वि. दा. सावरकर, रवींद्रनाथ टागोर, कवि गोविंद, डॉ. पटवर्धन (माधव ज्यूलीयन), श्रीधर-मनोरमा आणि गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता वगैरे या ग्रंथांतील प्रकरणे इतकी सुन्दर अन् सुरम्य आहेत की काव्योपासकांना ती नेहमीच वाचावीशी वाटतील. चिपळूणकरांच्या अभ्यासकांना त्यांचा विष्णु-शास्त्री चिपळूणकरांवरील प्रबंध म्हणजे एक मोठेच खाद्य होय. आपल्या 'माझे लेखनगुरु' या ग्रंथात त्यांनी श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, तात्यासाहेब केळकर, काकासाहेब खाडिलकर, हरिभाऊ आपटे, चिपळूणकर नि लोकमान्य टिळक या लेखनात आपल्याला आदर्श वाटणाऱ्या लेखनगुरूंना त्यांनी जी गौरवांजली वाहिलीय त्यात त्यांची नुसती गुरुभक्तीच दिसत नाही तर त्यांनी या गुरूंचे विश्लेशण किती चिकित्सक बुद्धीने केले आहे ते पाहिल्यावर त्यांच्या लेखनातली मार्मिकता तर दिसतेच पण त्यांच्या व्यापक व्यासंगाचेही वेगळे दर्शन घडते. फडके, अत्रे अन् पु. ल. देशपांडे हे आपल्याकडे व्यक्ति-चित्र रेखाटण्यात ख्यातनाम आहेत. या प्रांतात माडखोलकरांचा पाटही त्यांच्याच पंगतीत मांडावा लागेल याची साक्ष त्यांच्या 'माझे आवडते लेखक' या टीकाग्रंथात पहावयास मिळेल. हा सारा ग्रंथ रमणीय अन् रेखीव व्यक्तिचित्रांनी नुसता नटलेला आहे. नाटककार, कादंबरीकार, साहित्यिक, पत्रकार, इतिहास संशोधक, संगीततज्ञ, संतवाङमयाचे अभ्यासी अन् थोर चरित्रकार अशा विविध शाखातल्या वाङ्मयभक्तांची ही व्यक्तिचित्रे बराच काळ वाचकांच्या लक्षात रहाण्यासारखी आहेत. जॉन मोर्ले (१८३८-१९२३) या त्रिखंड कीर्तीच्या ग्रंथकारावर त्यांनी लिहिलेला मृत्युलेख हे या ग्रंथाचे मोठे भूषण म्हणून सांगावे लागेल. राजकारणाचा अभ्यास, वाङ्मयाचे प्रेम अन् इंग्रजी वाङ्मयाचा व्यासंग याचा त्रिवेणी संगम म्हणजेच हा माडखोलकरांनी लिहिलेला मृत्युलेख.

मॅट्रीकपर्यंतचे शिक्षण (गणित विषय हरीभाऊ आपटयांप्रमाणे त्यांना नडत गेल्यामुळेच ते मॅट्रीक झाले नाहीत असे त्यांचे बालमित्र वि. ह. कुळकर्णी आजही गंमतीने सांगतात पण आपल्या मित्राचा व्यासंग पदवीधरालाही लाजवील इतका श्रेष्ठ दर्जाचा आहे ही गोष्टही ते ठासून सांगतात) झाल्यानंतर व काही काळ पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश'-मध्ये नोकरी केल्यानंतर माडखोलकर १९२४ साली नागपूरला गेले ते कै. दादासाहेब ओगले यांच्या 'महाराष्ट्र' साप्ताहिकात. १९४४ साली त्यांनी स्वतःचे 'तरुण भारत' दैनिक काढले. त्यात संपादक म्हणून त्यांनी पंचवीस वर्षे काम करून थोर पत्रकार असा लौकिक महाराष्ट्रात मिळविला. गेली ४५ वर्षे ते या वृत्तपत्र व्यव-सायात असून आता ते 'तरुण भारत'चे ज्येष्ठ संपादक म्हणून महा-राष्ट्रात सुपरिचित आहेत. या व्यवसायात ते शिरले ते ६८ रुपये वेतनावर. पुढे त्यांचे वेतन ७०० रुपयांवर गेले तरी त्यांचा संसार यशस्वी झाला तो त्यांनी लिहिलेल्या आवांतर लेखनामुळे अशी स्पष्ट कबुली त्यांनी 'सोबत' साप्ताहिकाच्या दिवाळी अंकात (नोव्हें. १९६९) दिलेली आहे. आचार्य अत्र्यांप्रमाणेच या व्यवसायात त्यांनी सर्व क्षेत्रातल्या मंडळीचा लोकसंग्रह केला तरी ते कुणाच्याही प्रलो-भनाला केव्हाही बळी पडले नाहीत अशी स्पष्ट कबुली त्यांचे मित्र वि. ह. कुळकर्णी मोठ्या आनंदाने नि अभिमानाने देतात. आपल्या वृत्तपत्रकारकीर्दीचा इतिहास माडखोलकरांनी 'सोबत'च्या दिवाळी अंकात सविस्तरपणे सांगितला आहे त्यावरून त्यांच्या निस्पृह वृत्तीची स्पष्ट कल्पना कुणासही येईल. 'लेखकाच्या धंद्याइतका नादान, दुसरा कोणताच धंदा नसेल' अशी कबुली त्यांनी पंचवीस वर्षांपूर्वी (मी आणि माझे लेखन–संपादक–मो. ग. रांगणेकर, पृ. ६० स. १९४३) दिली असली तरी आता त्यांचे मत तसे नसावे असे वाटते. कारण या घडीला त्यांची सांपत्तिक स्थिती अगदी उत्तम आहे. त्यांचा मुलगा चंद्रशेखर हा नागपूरमधील नामवंत वकील असून विमानाने सतत प्रवास करण्याची त्याची ऐपत आहे. याविषयी आजही माडखोलकर गंमतीने म्हणतात – "पूर्वी चंद्रशेखरला माझा मुलगा म्हणून, सारे ओळखत. पण आज नागपुरात मला सगळे ओळखतात ते त्याचा बाप म्हणून".

## साधी नि स्वच्छ राहणी

खाजगी जीवनात माडखोलकर फार साधे आहेत. स्वच्छ धुवट धोतर, बंद गळयाचा कोट अन् पायात स्लीपर असा त्यांचा वेष असतो. मोटारीमधून आपल्या एखाद्या मित्राकडे जायचे असले की ते नुसत्या धोतर नि अर्ध्या बाह्याच्या शर्टानीशी जाण्यासही कमी करणार नाहीत. त्यांचा तरुणपणचा काळ मुंबईत गेला तरी आज मुंबईत आले की एखाद्याला सोबतीला घेतल्याशिवाय ते काही बाहेर पडायचे नाहीत. त्यांचे जिगर दोस्त कै. उमाकांत भेंडे त्यांची बड-दास्त एखाद्या राजाप्रमाणे ठेवीत. अमेरिकेत जाऊनही माडखोलकर

अनुक्रमणिका

शाकाहारीच आहेत. चांगलेचुंगले जेवण त्यांना आवडते. फळांचे ते भोक्ते आहेत. मांसाहार त्यांनी वर्ज्य मानला असला तरी मदिरेचा आस्वाद ते घेत नसतीलच असे काही सांगता येणार नाही. त्यांच्या गबाळ्या पोशाखावर भेंडे फारच चिडत. गप्पा मारण्याची हौस त्यांना आहे. ग्रंथसंग्रहाचा नादही त्यांना जबर होता; पण त्यांचा सारा ग्रंथसंग्रह गांधीवधोत्तर झालेल्या दंगलीत आगीच्या भक्ष्यस्थानी पडला. यावेळी माडखोलकरांनी म्हटले–'माझं सर्वस्व, माझं सगळं जीवनधन म्हणजे माडीवर ठेवलेला तो दोन पिढ्यांचा ग्रंथसंग्रह होता. मी एखाद्या कृपणाप्रमाणे जपत असे त्या ग्रंथसंग्रहाला... १९२४ साली पुण्याहून नागपूरला येताना मी आमचा इतर सारा संसार त्या त्या ठिकाणी टाकून आलो; पण पुस्तकं मात्र सगळी अत्यंत काळजीपूर्वक मी जिथं गेलो तिथं माझ्याबरोबर नेली. ते हे माझे वाङ्मयीन जीवनातले सहप्रवासी आज मला कायमचे सोडून गेले. खरोखर, ग्रंथ भस्मीभूत झाल्यामुळे माडखोलकर अतिकेत झाले. म्हणूनच की काय उमाकांत भेंड्यांशी माझी ओळख करून देताना ते म्हणाले–"हे ताटके तुमच्याप्रमाणं ग्रंथसंग्रही आहेत बरं का!"

नागपुरात आज माडखोलकरांचे स्वतःचे घर आहे. त्यांच्या प्रिय पत्नी शांताबाई या १९५० साली निवर्तल्या. पत्नीवर त्यांचे अलोट प्रेम होते म्हणूनच त्यांच्याविषयी निगडीत असलेल्या आठवणींचा उल्लेख त्यांनी अतिशय हळुवारपणे आपल्या सत्यभामा कादंबरीच्या निवेदनात (पृ. ३–४) केलेला आहे. त्यांची मुलगी मीनाक्षी फडणीस ही विवाहित असून लेखिका आहे. मुलगा चंद्रशेखर वकील असला तरी वाङ्मयप्रेमी आहे. त्यांच्या सूनबाई सौ. उमाबाई ह्या सुविद्य असून माडखोलकरांच्या अलीकडच्या ग्रंथांचे कॉपीराइटस् सूनबाईंच्याच नावे असतात. लहानपणी माडखोलकर श्रीमंतीत वाढले तरी त्यांचा स्वभाव काटकसरीच राहिला आहे. पत्राला लागलीच उत्तर देण्याची आपल्या गुरूंची (श्री. कृ. कोल्हटकर) परंपरा त्यांनी पाळली आहे एवढेच नव्हे तर परवा ते ठाण्याला येऊन गेले त्यावेळी येण्यापूर्वी मराठी ग्रंथसंग्रहालयाचे एक कार्यकर्ते श्री. पाटील यांना लिहिलेल्या पत्रात मला भेटण्याचे निमंत्रण त्यांना मुद्दाम दिले. स्वभावाने ते रसिक असून सौंदर्याचे मोठे पूजक आहेत. तसा त्यांचा स्वभाव रागीटच आहे पण सुहृदांवर ते लोभावतात. मदतीचा उल्लेख ग्रंथात न विसरता करतात. माझ्यासारख्या त्यांच्या तरुण स्नेह्यांना ते आपली पुस्तके स्वतःच्या स्वाक्षरीने भेट देतात. उमाकांत भेंडे गेल्यावर मी लागलीच त्यांच्यावर लेख तर लिहिलाच पण नंतर त्यांच्या 'पडछाया' पुस्तकावर लगोलग परीक्षणही लिहिले तेव्हा माडखोलकरांनी मला जी पत्रे लिहिली त्यात त्यांच्या करुण स्वभावाचे अन् आपल्या निधन पावलेल्या प्रिय स्नेह्यावरील प्रेमाचे आगळे दर्शन मला पहावयास मिळाले. ज्योतिषावर त्यांचा विश्वास असावा असे दिसते. मागे एका पत्रात त्यांनी मला लिहिले 'ही माझी शेवटचीच मुंबईची खेप' मला त्याचा अर्थ समजेना. म्हणून त्यांच्या एका निकट स्नेह्यांना त्याविषयी विचारले तेव्हा ते हंसून म्हणाले–"भाऊसाहेबांचा ज्योतिषावर विश्वास फार आहे. एका ज्योतिषाने त्याना सांगितलंच की त्यांचा जीवन ग्रंथ लौकरच आटोपणार म्हणून. तरीच त्यांनी तुम्हांला असं लिहिलं असावं'.

## आणखी उदंड साहित्य हवे

पण मी काही असल्या भविष्यावर विश्वास ठेवणार नाही. कारण परवाच ठाण्याला भेट झाली तेव्हा मला माडखोलकरांची प्रकृती खणखणीत दिसली. त्यांची सत्तरी उलटणार आहे असे मला मुळीच वाटले नाही. केवळ लेखणीवर पंचेचाळीस वर्षे नागपुरास ठाण मांडून बसलेल्या नामवंत माडखोलकरांची सारी कारकीर्द मी आठवत होतो. केळकर, अच्युतराव कोल्हटकर, शि. म. परांजपे, आचार्य अत्रे इत्यादी नामवंत पत्रकारांची मृत्युलेख-अग्रलेखांची परंपरा त्यांनी कशी पाळली त्याची याद मला होत होती. त्याच सुमारास चाळीस साली पाहिलेल्या माडखोलकरांची मूर्ती माझ्या डोळ्यासमोर उभी राहिली. त्यांचा तेव्हाचा गबाळा पोशाखही मला आठवला. अन् मग मला भेंड्यांचे शब्दही आठवले. भेंडे मला म्हणाले होते–"ताटके, भाऊसाहेबांच्या बेंगरूळ पोशाखाकडे मुळीच पाहू नका. फक्त पहा त्यांचा बोलका चेहरा नि ऐका त्यांचं लोभस संभाषण" परवा मराठी ग्रंथसंग्रहालयात ते चर्चा करीत असताना मला भेंड्यांच्या शब्दांची पुन्हा प्रचिती आली. नंतर ओळखीचा कार्यक्रम सुरू झाला. श्री. द. दा. काळे ओळखी करून देत होते. माझ्याकडे अंगुलीनिर्देश झाला तेव्हा लागलीच माडखोलकर म्हणाले, 'मी ओळखतो त्यांना'. एकावन्न साली साबरमती बोटीत त्यांच्या आवाजात जी भावमधुरता होती ती अजूनही कायम आहे. १९४८ साली त्यांचा ग्रंथसंग्रह नष्ट झाला. १९५० साली त्यांची गृहलक्ष्मी गेली. त्यांची सहचरी लेखणी मात्र अजून त्यांच्या सांगाती आहे. आणखी एक कादंबरी पुरी करण्याचा विश्वास अजून त्या लेखणीत कायम आहे. सत्यभामेच्या निवेदनात सूचित केलेले आणखी एका कादंबरीचे स्वप्न साकार करण्यासाठी उदंड आयुष्य अन् उत्तम आरोग्य एकाहत्तरीत प्रवेश करणाऱ्या भाऊसाहेब माडखोलकरांना परमेश्वराने द्यावे ही माझी प्रार्थना माझ्या माहितीच्या माडखोलकरांना खचित आवडल अशी मला आशा आहे. • • •

